# कडू आणि गोड

गंगाधर गाडगीळ

जीवन-साहित्य : ८

| | | | |
|---|---|---|---|
| १ | कडू आणि गोड | | .. १ |
| २ | शशीचें दु.ख ! | .. | ... १५ |
| ३. | किडकेलीं माणसें | ... | ... २६ |
| ४. | क्षुल्लक गोष्ट | ... | ... ३६ |
| ५. | हृदय | ... | ... ४७ |
| ६. | सलामी | . . | ... ५७ |
| ७ | शितकण | ... | ६९ |
| ८. | नावीन्य | ... | ८० |
| ९. | गिचमिड | ... | ... ९० |
| १०. | चोरटीं पाउले | ... | ... ९८ |
| ११. | एकटा | ... | . १०८ |
| १२ | पावसाळी हवा | ... | ...११८ |
| | श्री. बा. सी. मर्ढेकर याचा लेख . ‘ गंगाधर गाडगीळ ’ | | १ ते १६ |

# कडू आणि गोड

आमच्या खोलींतल्या मोठ्या आरशात पाहून मी माना लचकावीत होतें-आदल्या दिवशीं पाहिलेल्या सिनेमातल्या नाच करणाऱ्या बाईप्रमाणे !

इतक्यांत दरवाजाच्या बाजूने आवाज आला, "वा ! फार छान चाललें आहे !"

.. इतकी दचकलें मी ! . इकडची स्वारी सकाळचें फिरणें आटपून घरीं आली होती घड्याळाच्या काट्यासारखें स्वारीचें काम चालतें. पावलांचा जरासुद्धा आवाज होत नाही

मी कोपऱ्यातल्या टेबलाजवळ गेलें आणि मान खाली घालून सरबत्तीची वाट पाहत उभी राहिलें.

"तूं फार शहाणी झाली आहेस "

मी हसूं आवरलें हे रागवायला लागले की मला हसूं येतें... ह्या पुरुषांना वाटतें की बायका खरोखरीच आपल्या रागाला घाबरतात...

"तुला नटवेपणा करायला पाहिजे काम करायला नको. घरांत भांडणें करायला पाहिजेत. कागाळ्या सांगायला हव्यात."

मी कागदावर कावळा काढीत होतें.

"कागद नासूं नको."

मीं पेन्सिल खाली ठेवली.

"मी तुझ्या पाठीशीं नाही बोलत आहे."

मी परत पदर तोंडाला लावला. आणि मग मुकाट्याने खोलीच्या-बाहेर जाऊं लागलें. पण माझें दाबलेलें हसूं स्वारीच्या नजरेतून सुटलें नाही.

ते ओरडले, "आणि उगीचच हसायची वाईट सवय आहे तुला."

वर मला एक चापटीचा प्रसाद मिळाला.

त्यांची चापटी म्हणजे राग गेल्याची निशाणी असते

मी खाली आले तों साताचे टोले माझ्या कानावर पडले साहेबाची अघोळीची वेळ झाली होती. म्हणून पाणी काढायला मी धावलें. हो, नाही तर परत...

पण बंबाजवळ येऊन पाहते तों बंब आपला थंडगार. अस्सें असतें थोरल्या जाऊबाईंचे कध्धी काम नीटपणें व्हायचें नाही.

मीं रागारागाने म्हटलें, "हे काय! बंबात कोळसे नाही वाटतें टाकले आज?"

असें काही मोठ्याने बोललें म्हणजे सासूबाईंना ऐकूं जातें. आमच्या सासूबाईंचे कान फार तिखट आहेत आणि जीभ त्याहून.

देवघरांतून सासूबाईंचा आवाज आला, "म्हणजे? गेली तरी कुठे ही घरांतलीं कामें टाकून? मुलखाची कामचुकार आहे मेली!"

सासूबाईंचा पट्टा सुरू झाला तेव्हा माझं मलाच ओशाळल्यासारखें वाटलें. मींच थोरल्या जाऊबाईंना सांगायला हवें होतें

जाऊबाई काय करीत होत्या तें पाहायला मी घरांत गेलें. पाहतें तों त्या माजघराच्या कोपऱ्यात जमिनीवरच पडल्या होत्या त्याना अनिवार दम लागला होता.

मला पाहताच त्या कशाबशा उठून बसल्या आणि म्हणाल्या, "मला फार धाप लागली आहे. जरा कमी झाली म्हणजे बंब पेटवतें"

मला एकदम वाईट वाटलें. मीं म्हटलें, "छे, इतका दम लागला असतांना काम कसें होईल तुमच्या हातून? मी अथरूण घालून देतें, आणि स्वस्थ पडा तुम्हीं. बंब पेटवीन मी."

देवघरात आमचें बोलणें ऐकूं गेलेंच. सासूबाई म्हणाल्या, "कोण बोलतें आहे तें तिकडे माजघरात? अन्नपूर्णाच का ती?"

थोरल्या जाऊबाई परत उठण्याकरिता धडपडूं लागल्या. पण मीं त्यांना खुणेने झोपून राहायला सांगितलें आणि म्हटलें, "त्याना दम लागला आहे. मी पेटवतें बंब."

त्यासरशी देवघर दणाणलें " म्हणजे ? खुश्शाल झोपून का राहिली आहे ती ? हद्द झाली ग बाई हिच्यापुढे ! बारा महिने आणि अठरा काळ सारखें हिचें आपलें आजारीपण दिवसातून काही चार काड्या इकडच्या तिकडे व्हायच्या नाहीत लग्न झाल्याबरोबर नवऱ्याचा दावा साधलान्, आणि आता मला छळून घेते आहे."

थोरल्या जाऊबाईंना एकदम रडूं कोसळलें. त्या पुटपुटूं लागल्या, "खरेंच. मीच पाढऱ्या पायांची आणि फुटक्या नशिबाची. स्वत च्या नवऱ्याला मारलें आणि आता ऐतोबासारखी बसून खातें आहे." आणि फडाफडा त्यानी आपल्या तोडात मारून घेतल्या

मी चटकन् त्याचा हात धरला पुढे काय करावें तें कळेना. मला कोरडा हुंदका आला आणि मीं त्याच्या अंगावरून हात फिरविला. तिथे आणखी बसलें असतें तर रडूंच आलें असतें. म्हणून मीं म्हटलें, " थाबा. मी तुम्हाला चहा करून देते म्हणजे अमळ बरें वाटेल."

त्या म्हणाल्या, " नको, नको. कशाला बरें वाटायला हवें ? मेलें म्हणजे बरें होईल."

ह्यावर कोण काय बोलणार ? मी मुकाट्याने स्टोव्ह बाहेर आणून पेटवला.

सासूबाई म्हणाल्या, "कोण खुडबुडतें आहे तें ? नारायण का आला आहे ? मग जरा देवघरात येऊन जा हो रे, नारायण !"

नारायण म्हणजे मधले भावोजी. अगदी साधेभोळे आहेत—बावळटच म्हणानात का ! पण सासूबाईंचें त्याच्यावर फार प्रेम आहे. सारखें देवघरांत बोलावून काही-ना-काही खायला देत असतात. इकडच्या स्वारीवर मात्र सगळ्याचा राग आहे का ? तर सर्वात जास्त पैसे मिळवतात म्हणून.

सासूबाईना ऐकायला जाऊं नये म्हणून स्टोव्हला फार पंप केला नव्हता.

इतक्यात मधल्या जाऊबाई लपक्-लपक् करीत तेथे आल्या. त्याना वाटतें की आपण फार सुंदर आहोत. आपण नटावे, थटावे, आणि काम न

करतां नुसता टेंभा मिरवावा. मला लोक देखणी म्हणतात आणि इकडच्या स्वारीला पगार जास्त आहे म्हणून त्या माझ्यावर जळफळतात. आणि सारख्या माझ्या चुगल्या करतात.

कमरेवर हात ठेवून त्यानी माझ्याकडे पाहिले, आणि मग मुद्दामच त्या मोठ्याने म्हणाल्या, " माडीवर का चहा हवाय् आता ? "

देवघरातून आवाज आला, " कोण चहा करते आहे तें ? "

मी मधल्या जाऊबाईंकडे रागाने पाहिलें.

तशी त्या ठसक्यात म्हणाल्या, " माझ्याकडे पाहून कशाला डोळे मोठे करता ? घरात तिनतिनदा चहा होतो आणि मग साखर सपली म्हणजे सासूबाई रागावतात. "

थोरल्या जाऊबाई काकुळतीने म्हणाल्या, " खरेंच, नका करूं तुम्हीं माझ्याकरितां कांही. तुम्हाला मात्र बोलणीं खावीं लागतील. माझें काय मेलीचें ? मेलें तर तें हवेंच आहे सगळ्याना "

तितक्यांत सासूबाई देवघरातून बाहेर आल्या आणि मला म्हणाल्या, " सुशिले, तूंदेखील फाजील होत चालली आहेस हो दिवसेंदिवस. नसत्या उठाठेवी कोणीं करायला सागितलंय् तुला ?..." आणि मग मला त्या खूप फडाफडा बोलू लागल्या

पण मी एक अक्षरहि बोललें नाही. बसले होतें मांजरीच्या पिलाकडे पाहात. थोरल्या जाऊबाईंना मात्र मेल्याहून मेल्यासारखें होत होते.

इतक्यांत जिना वाजला. इकडची स्वारी अंघोळीला येत होती त्यासरशी जिकडेतिकडे सामसूम झाली.

अंघोळीला गरम पाणी नव्हतें. तेव्हा साहेबानी ओरडा करू नये म्हणून मीं त्याना डोळ्यानी खुणावण्याचा खूप प्रयत्न केला. (कारण सासूबाईंना सासरेवाशिणींनी पुरुषाशीं बोललेलें आवडत नाही.) पण स्वारी होती आपल्याच तंद्रींत. असेल एखादें भलें मोठें पुस्तक डोक्यात भरून राहिलेलें.

मग मोरींतून स्वारी तावातावाने परत आली आणि ओरडूं लागली,

" हें काय ? आज अघोळीला गरम पाणी नाही वाटते ? करतां काय तुम्हीं बायका घरात बसून ? "

मी बोटानेच त्याना गप्प राहायला सागितलें. पण ते मोठ्याने म्हणाले, " आ ? "

असले हे पुरुष. शेवटीं मला बोलावें लागलेंच. मी म्हटलें, " आज थंड पाण्यानेच अघोळ करा तुम्हीं. "

ते कमरेवर हात ठेवून म्हणाले, " का ? "

मी रागावून म्हटलें, " मी सागतें म्हणून "

मग बसली स्वारी गप्प.

पण इतक्यात मधल्या जाऊबाई स्वैपाकघरांतून आल्या आणि त्यानी मध्येच तोंड खुपसलें, " म्हणजे ? भावोजींना थंड पाण्याने का अंघोळ करायला सागताय् तुम्हीं ? आणि उद्या थंडी झाली म्हणजे ? इतकें का जड झालंय गरम पाणी द्यायला ? थाबा, मीच देतें त्याना पाणी गरम करून. " आणि उगीचच ह्याच्या अंगावरून त्या घरात गेल्या.

त्यासरशी माझें डोकें उसळलें. मधल्या जाऊबाईंना असला चोंबडेपणा करायची फार सवय आहे उगीचच पुरुषाच्या पुढे-पुढे करतील. डावा पाय नाचवीत गुळुगुळु बोलतील. आणि तेवढ्यात दुसऱ्याची नालस्ती करतील आम्ही नाही बाई अशा दुसऱ्याच्या पुरुषापुढे नाचत.

मीं चहाचें आधण उतरून टाकलें आणि थोरल्या जाऊबाईंना म्हटलें, " तुम्हींच घ्या आता चहा गाळून "

मग चट्दिशी पाण्याचें मोठें पातेलें स्टोव्हवर ठेवलें, आणि फराफरा स्टोव्हला पंप केला आणि पाण्याला आधण आलें तशी तें भस्दिशीं त्याच्या बादलींत नेऊन ओतलें. थोडेसें त्याच्या अंगावर उडालेंदेखील.

ते म्हणाले, " अग, अग, तुझें डोकेंबिकें फिरलंय् की काय ? "

मीं म्हटलें, " हो. थंड पाणी किती लागेल तें पाहा."

ते म्हणाले, " हं पुरे, पुरे. अग, पण असें झालें तरी काय उसळायला ? तुला पाणी नव्हतें गरम करायचें तर वहिनी करीत होती ना ? "

मीं चिडून म्हटलें, " मग नकोय् का माझें पाणी ? तर टाकत्यें ओतून. "

" म्हणजे ? "

" तें नाही तुम्हाला समजायचें असल्या गोष्टी तुमच्या पुस्तकात नसतात लिहिलेल्या. " आणि मी घरात आलें.

भोळे साब असतात पुरुष म्हणजे !

माजघरात थोरल्या जाऊबाई चहाचे हळुहळु घुटके घेत होत्या. इतक्यात त्याचा मुलगा कृष्णा तेथे आला

आईला चहा पिताना पाहून तो ओरडला, " हें काय ? तूं एकटी चहा पित्येस काय, आई ? आणि आम्हीं मागितला म्हणजे मात्र आमच्या अंगावर ओरडतेस दे मला चहा "

थोरल्या जाऊबाई हलक्या आवाजात म्हणाल्या, " अरे कृष्णा, माझी तब्येत बरी नाही म्हणून तुझ्या काकूने मला हा चहा करून दिलान् हो. तूं आतां बाहेर जाऊन अभ्यास कर जा."

कृष्णा हातपाय आपटीत म्हणाला, " तूं म्हणजे आम्हाला काही द्यायची नाहीस. बाबा कसे मला माडीवर घ्यायचे, खायला द्यायचे, फिरायला न्यायचे. तूं मात्र अभ्यास करायला सागतेस, आणि काम करून घेतेस. थाब, मी आता घरात जाऊन डब्यातला लाडू खातो "

थोरल्या जाऊबाईंच्या डोळ्यातून परत पाणी घळघळा वाहूं लागले. आणि तोंडाशीं नेलेली चहाची बशी त्यानी खाली ठेवली. मीं मग कितीहि आग्रह केला तरी त्याना तो चहा पिववेना.

कृष्णा स्वैपाकघरात जाऊन डब्याशीं खुडबुडूं लागला. तशी सासूबाई किंचाळूं लागल्या. तें ऐकून थोरल्या जाऊबाई धाप लागली होती तरी घरात धावल्या, आणि हाताला रवी लागली तीच घेऊन त्यानी कृष्णाला मरेमरेतों मारलें.

मीं चटकन् पुढे होऊन त्याला सोडवलें आणि बाहेर घेऊन गेलें.

तो हुंदके देत-देत म्हणाला, " आई वाईट आहे."

मीं म्हटलें, " नाही रे, बाबा. आम्हींच सगळीं वाईट आहोंत " आणि त्याला दोन वड्या दिल्या तशी तो हसूं लागला. इकडे डोळ्यातून पाणी गळतच होतें.

त्याला तसा हसताना पाहून माझ्या पोटात मात्र कालवाकालव झाली.

मीं मान फिरविली आणि स्वैपाकघरात कामाला गेलें. इतक्यात देवघर बोललें, " अग, रघू उठला का ? "

–रघू म्हणजे आमचे धाकटे भावोजी सरपणाच्या लाकडासारखी प्रकृति आहे जाड भिंगाचा चष्मा लावतात, परीक्षा नापास होतात, आणि आधीच लाब असलेले तोंड अधिकच लाब करून बसतात. असें नुसतें बसून त्याना कसें करमतें कोण जाणे !

सासूबाईंनी परत तोच प्रश्न विचारला.

मीं म्हटलें, " अजून आठ वाजायचे आहेत. त्याची उठायची वेळ झाली नाही अजून."

सासूबाई म्हणाल्या, " अग, त्याची परीक्षा आली आहे ना आता जवळ. अभ्यास करायला लवकर उठणार आहे तो...आणि काल ताप आलाय् म्हणून म्हणत होता "

–भावोजींच्या तापाचें रोजच कौतुक चाललेलें असतें डॉक्टराना दाखवलें म्हणजे म्हणतात,"ह्याला काही होत नाही आहे तुम्हीं लग्न करून टाका ह्याचें." पण सासूबाई म्हणतात की, शिक्षण झाल्याशिवाय लग्न नाही करायचें. त्याना वाटतें की, भावोजींनी खूप शिकावें आणि इकडच्या स्वारीहून जास्त पगार मिळवावा ह्याच्याविषयीं का इतका दुष्टपणा लोकाना वाटतो कोण जाणे !...

मी पुटपुटलें, " पुरें झालें कौतुक. "

लगेच देवघरातून आवाज आला, " काय म्हणालीस ? "

मीं म्हटलें, " काही नाही. " आणि भावोजींना उठवायला गेलें. ते अंथरुणांत जागेच होते आणि आपल्याशींच काहीतरी बडबडत होते.

मीं दारातच उभी राहून म्हटलें, " भावोजी, सासूबाईंनी उठवायला पाठवलें आहे. "

भावोजींचा चेहरा अधिकच लांब झाला आणि ते म्हणाले, "वहिनी, इकडे ये ग जरा. मला ताप आलाय् का बघ."

मीं म्हटलें, "मला नाही तें समजायचें मी कृष्णाबरोबर थर्मामिटर पाठवून देतें."

भावोजी म्हणाले, "अग, पण—"

मीं म्हटलें, "लवकर खाली या, नाहीतर चहा थंड होईल."

ते म्हणाले, "तूं वरच घेऊन ये चहा."

मीं म्हटलें, "मला काम आहे."

भावोजी अंथरुणातून उठत म्हणाले, "माझी दाढी वाढली आहे का ग ?"

मीं म्हटलें, "मला नाही माहीत" आणि खाली जाऊं लागलें. वाटेंत ह्याची स्वारी म्हणाली, "उठला नाही का तो मूर्ख अजून ?"

मीं म्हटलें, "उठताहेत आताच."

हे रागारागाने भावोजींच्या खोलीत गेले त्याच्या टेबलावरच्या सगळ्या इंग्रजी कादंबऱ्या बाहेर फेकून दिल्या. आणि अभ्यासाचें पुस्तक हातात घेऊन त्याना खुर्चीवर बसवलें.

हसून-हसून माझी मुरकुंडी वळली इतक्यात मामंजींच्या खोलीच्या बंद दाराकडे माझें लक्ष गेलें, आणि मी दचकून हसायची थाबलें. आमचे मामंजी मोठे कडक आणि हुषार आहेत. नेहमी दार बंद करून आपल्या खोलींत बसलेले असतात, आणि कसलेतरी हिशोब लिहीत असतात. पण घरांत काय चाललें आहे ह्याची बारीकसारीक बातमीदेखील त्याना असते. त्यांनी एखाद्या माणसावर डुख धरला की त्याला ते सळो की पळो करून सोडतात. दररोज संध्याकाळीं ते बाहेर जातात, आणि उशिरा विडा चघळीत परत येतात...

मी तशीच जिन्यावर खोळंबून उभी राहिले. स्वारी भावोजींच्या खोलींतून बाहेर पडली की जिन्यात भेट झाली असती.

इतक्यात मामंजींच्या खोलीचें दार उघडलें. आणि मधल्या

जाऊबाई चहाचा रिकामा कप घेऊन बाहेर पडल्या मला पाहून त्या एवढ्याने दचकल्या की त्यांच्या हातातला कप खाली पडून खळकन् फुटला.

मी मुकाट्याने जिना उतरून खाली गेलें, आणि मग थोडा वेळ मला कामच सुचेना

मधल्या जाऊबाई मात्र आपल्या नवऱ्यावर सगळा वतार काढीत होत्या "नुसते बसले आहात ते नारळ फोडा जरा . जाता-जाता तेवढे पाट आडवे करा" आणि मधले भावोजी खुशाल सगळी घरातलीं कामे करीत होते त्यामुळे मला मात्र चोरट्यासारखे होत होते.

मंडळी जेवायला बसली तशी मी चटकन तूप वाढायला घेतलें सासूबाई नेहमी तूप आणि दही वाढतात आणि तेवढ्यात धाकट्या भावोजींना दोन चमचे जास्त पडतात, आणि कृष्णाच्या व इकडच्या स्वारींच्या पानात मात्र तूप पडते न पडतें इतकेच म्हणून मी मुद्दामच तूप वाढायला घेतलें.

मामंजींना चमचाभर तूप वाढून मी पुढे सरकणार होते इतक्यात ते म्हणाले, "वाढायचा का थांबलीस ? मी पुरे म्हटले नव्हतें"

मी परत तूप वाटले, आणि मला उगीचच भीति वाटूं लागली.

तेवढ्यात इकडच्या स्वारीने माझ्याकडे रागावून पाहिलें

असे जर सारखे-सारखे झाले तर ह्यांना खरोखरच असे वाटायला लागेल की मी लुच्ची, भाडकुदळ आणि चहाडखोर आहे.

जेवण झाल्यावर मी घाईघाईने उष्टंमेण करून वर गेलें. पण तेवढ्यात कपडे करून स्वारी निघूनदेखील गेली होती. अस्सा राग आला...

पलीकडच्या खोलीतून मधल्या जाऊबाईंच्या खेकसण्याचा आवाज आला. तशी मी कान देऊन ऐकूं लागलें

जाऊबाई म्हणत होत्या, "किती दाढी वाढली आहे ती ! आरशात तरी पहा जरा"

"असूं दे ग. त्यात काय मोठेसे ? मला उशीर होतोय् आता."

"हो. तुम्ही असा बावळटपणा करता आणि मला मात्र जिथेंतिथें मान खालीं घालावी लागते"

"मग म्हणणें काय तुझें ? दाढी करूं का आता ?"

"नको-नको कशाला इतके उपकार करता माझ्यावर ?"

"तुझ्या काहीच मनास येत नाही. मग जाऊ मी आता ?"

"मला दहा रुपये द्या !"

"दहा रुपये ? महिनाअखेर एवढे कुठून आणूं मी ?"

.हुंदके. .समजावणे रडणे काकुळतीने समजावणें खेकसणें

शेवटीं भावोजी पडलेल्या चेहऱ्याने आणि खालच्या मानेने जिना उतरले भावोजी म्हणजे विचित्रच आहेत जाऊबाई जितक्या त्याना हिडिसफिडिस करतात, तितके ते अधिकच त्याच्या ताटाखालचें माजर होतात.

–दुपारी भाडी विसळून घेतलीं, आणि वर जाणार होतें इतक्यात सासूबाईंच्या भावाच्या मुली आमच्याकडे आल्या

त्यातली दात पुढे आलेली म्हणाली, "आत्या-आत्या, साटें आणलीं आहेत हो तुला कोकणातून आणि ह्या काजूबिया" आणि साटाचे चार तुकडे आणि ओजळभर काजूबिया तिने सासूबाईसमोर ठेवल्या.

सासूबाई खुलल्या आणि म्हणाल्या, "छान केलेंस हो, छान केलेंस. अग, आजकाल एवढें अगत्य तरी कोणाला वाटतंय् ?"

"म्हणजे ? आत्या, तुझ्याविषयीं नाही अगत्य वाटायचें तर कोणाविषयीं वाटायचें ?"

"अग, असे आपले तुम्हाला वाटतें. ह्या घरात मी अगदी नकोशी झाल्येंय् हो"

"म्हणजे ? इथवर का मजल गेली सुनाची ? त्याना नको असली तरी आम्हाला हवी आहेस हो तूं, आत्या चल कोकणात आमच्याबरोबर.."

मग थोड्या वेळाने घर ढाढूळायला सुरुवात झाली दोन चागले सुबक घाटाचे डबे गेले, पेटींतल्या हस्तिदंती फण्या गेल्या, आणखी कित्येक बारीकसारीक वस्तू गेल्या मधल्या जाऊबाईंनी घाईघाईने आपल्या सगळ्या वस्तू ट्रंकेंत बंद करून कुलूप लावलें. मला ते सुचलें नाही. त्यामुळे माझीं

दोन पातळें गेलीं शेवटी माझा एक रेशमी झपर अंगाला लावून पाहात एक म्हणाली, "आत्या, मला अगदी ठिक्क होईल नाही ग हे पोलके ?"

सासूबाई म्हणाल्या, "अग, मग घे हो तुला तो ती काय, शिवील नवीन नाहीतरी ट्रंका भरभरून कपडे आहेत ते करायचे काय ?"

अस्सा राग आला मला ! ह्यानी मुद्दाम हौशीने मला तें कापड आणून दिलें होते. पण पुढे मजल जाऊन जेव्हा एका लहान मुलीने ह्याच्या पेनला हात लावला, तेव्हा मी ते खस्‌दिशी ओढून घेतलें त्या मुलीने सासूबाईंकडे तक्रार करण्याचा प्रयत्न केला पण सासूबाईंना काही ऐकूंच गेलें नाही. इतका ह्याचा घरात वचक आहे.

त्याच्याकरिता शिरा अन् चहा करताना माझा जीव अगदी थकून गेला आणि इतकें खाल्लें मेल्यानी की दोन घास शिरादेखील शिल्लक राहिला नाही.

थोरल्या जाऊबाईंचा कृष्णा बापडा एवढेसें तोंड करून भोवती घोटाळत होता.

जायच्यापूर्वी त्या मुलींनी परत सगळ्या फळ्या ढाह्ळल्या. सासूबाईंची पैशाची कोनफळीदेखील पण मला तेव्हा संशय आला नाही

शेवटी पाच वाजता मला वर जायला मिळाले

धाकटे भावोजी कॉलेजातून आले होते ते म्हण.ले, "चल वहिनी, आपण कॅरम् खेळू या"

मीं म्हटलें, "नको, माझें डोकें दुखतें आहे" आणि खोलींत जाऊन कडी लावून घेतली आमच्या साहेबानी एक पुस्तक वाचायला सागितलें होतें पण पुस्तक वाचायला लागलें म्हणजे मुळी मला झोप येते.

पण जरा डोळा लागतो न लागतो तोंच घरात सासूबाईंचा आरडाओरडा सुरू झाला काय झालें होतें कोण जाणे !

अस्सा सपाटून राग आलाय् मला. हसू येईल तुम्हाला, पण राग आला म्हणजे मला काहीतरी खावेसें वाटतें. वाटलें की दुध्या हलवा आणून खावा चांगला बराचसा.

म्हणून माझी पेटी उघडली. तर मेले सुटे पैसेच सापडेत ना शेवटीं पाच रुपयाची नोट घेतली, आणि चोरपावलानी जानकी मोलकरणीला दुध्या हलवा आणायला सागायला गेलें

पण मागल्या दारीं पोहोचतें तोच सासूबाई कुठूनशा आल्या आणि म्हणाल्या, "कुठे ग चाललीस ?"

मीं दचकून म्हटलें, "कुठे नाही बाई." आणि तेवढ्यात माझ्या हातातली पाच रुपयाची नोट खाली पडली.

सासूबाईनी ती पाहिली, आणि कपाळावर हात मारून म्हणाल्या, "शर्थ झाली ग बाई तुझ्यापुढे !"

मीं घाबरून विचारलें, "काय झालें ?"

"शाब्बास ! आणखी काय झालें म्हणून विचार. माझ्या कोनफळी-वरचे पाच रुपये तूंच ना हे घेतलेस ?"

"नाही. मीं नाही घेतले. हे माझे पाच रुपये आहेत."

"तर, तर. माझे आहेत म्हणे हातात पाच रुपये घेऊन मागील-दारीं कोणी असें चोरपावलानी हिंडतें का ?"

मला काय बोलावें तेंच सुचेना. मी अगदी भाबावून गेलें. घरांतलीं सारीं माणसें माझ्याभोवती जमलीं आणि मला वाटेल तसे बोलूं लागलीं. शेवटीं मामंजींनी मला हाक मारली.

मला रडूं कोसळलें. आजपर्यंत असला आळ कोणीं माझ्यावर घेतला नव्हता...त्याना जर तें खरें वाटलें तर.

मामंजी शात आवाजात म्हणाले, "सूनबाई, तूं का घेतलेस ते पाच रुपये ?" त्याच्या शातपणाने मी अधिकच घाबरलें.

इतक्यात इकडची स्वारी कामावरून घरीं आली मामंजींच्या खोलींत येऊन ते म्हणाले, "काय गडबड आहे ?"

तशी धाकट्या भावोजीनी तिखटमीठ लावून सगळी हकीकत सांगितली.

मीं एकदम मध्येच म्हटलें, "तुमची शपथ, मीं पैसे चोरलेले नाहीत."

त्यानी एकवार माझ्याकडे पाहिलें, आणि मग ते जोराने म्हणाले, "काय मूर्खपणा आहे हा सगळा? ती चोरीबिरी मुळींच करायची नाही. तिला मी पैसे देत नाही की काय?"

त्यासरशी सगळी गप्प झालीं मामंजीदेखील! मी चटकन् तेथून पळालें.

सासूबाई तर अशा चडफडल्या ह्यामुळे! तितक्यात थोरल्या जाऊबाईचा कृष्णा तेथे बावळटासारखा आला तशी सासूबाई त्याचें बकोट धरून ओरडल्या, "तूच चोरले असशील मेल्या पैसे" आणि खुशाल त्याला बदडू लागल्या.

तो गयावया करूं लागला, "शप्पथ, मीं नाही चोरले पैसे. मुळींच नाही चोरले." पण त्या बापड्याचें कोण ऐकणार?

इतक्यात कोनफळी ढाढुळणाऱ्या त्या मुलींची आठवण झाली. आणि चटकन् माझा संशय सागून कृष्णाला सोडवावें असें वाटलें. पण मला भीति वाटली. आणि मग 'नको तें दृश्य पाहायला' म्हणून मी माडीवर जाऊं लागलें.

शेजारच्या खोलींत थोरल्या जाऊबाई भिंतीला चिकटून उभ्या होत्या, आणि कृष्णाला चाललेली मारपीट ऐकत होत्या. कृष्णा मोठ्याने ओरडला तशी त्यानी तोंडात लुगड्याचा बोळा कोंबला, कानावर हात ठेवले. तरी त्याचें शरीर हुंदक्यानी गदगदत होतें. डोळ्यातून टिपें ओघळत होतीं.

त्याची ती अवस्था पाहून मी अगदी घाबरून गेलें. त्याच्या खाद्यावर हात ठेवून त्याना घरात न्यावे असें वाटलें. पण त्याच्याजवळ जायचा धीर होईना.

शेवटीं ह्याच्या कानावर त्याची सगळी हकीकत घालावी म्हणून मी वर खोलींत गेलें.

पाहतें तों हे, आरशात पाहून हातवारे करून आणि तोंड वेडीं-बाकडीं करून, मोठमोठ्याने कसलींतरी इंग्रजी वाक्यें बडबडत होते.

तशी असें हसूं लोटलंय् मला. मी पलंगावर बसून पोट धरधरून हसूं लागलें.

हे पहिल्याने दचकले, आणि मग माझ्यावर मोठ्याने ओरडूं लागले पण त्याना रागावता येईना, आणि मला हसूं आवरेना.

सरतेशेवटीं तेच स्वत हसूं लागले.

—आणि मग जाऊबाईंची हकीकत सागायचें राहूनच गेलें.

# शशीचें दुःख !

सकाळीं उशिरा उठणें ही काहीतरी विशेष गुलगुलीत आणि ऐटबाज गोष्ट आहे असें दादाने लोकप्रिय लघुनिबंधांत वाचलें होतें, व स्वत ला तें पटवून घेतलें होतें आणि मेकॉलेसाहेबाच्या म्हणण्याप्रमाणे तें ज्ञान झिरपत-झिरपत चिमुकल्या शशीच्या डोक्यात शिरलें होतें.

म्हणून दूध प्यायची आपली इच्छा आवरून तो साडेसात वाजले तरी अथरुणांत पडून राहिला होता आईचीं पावलें वाजलीं तशी शशीने एक हात गालावर ठेवला, आणि आपल्या मतें झोपेचें सोंग पुरें केलें. झोप लागली की माणसें गालावर हात ठेवतात अशी शशीची प्रौढ समजूत होती.

आई म्हणाली, " शशी, अरे शशी ! ऊठ रे राजा माझ्या ! "

आईचे शब्द ऐकून शशीचे बंद डोळे त्याच्या इच्छेविरुद्ध मिचमिचूं लागले. आईने तें पाहिलें आणि तिचा आवाज बदलला.

" मेल्याऽ, मुद्दाम का हें सोंग करतो आहेस ? ऊठ आधीं ! " आणि खसकन् त्याचा हात ओढून आईने त्याला बसलें केलें

अपेक्षा केली होती तेंच झालें असा शशीने आविर्भाव केला. आणि गंभीरपणें तो म्हणाला, " गुलाबची सावत्र आई तिला अशीच खसकन् हात ओढून उठवायची हो."

आई आश्चर्याने म्हणाली, " ही कोण ही गुलाब ? "

" अग, आमच्या गोष्टींच्या पुस्तकातली हो. "

शशीला वाटलें होतें की, आपल्या मर्मभेदक वाक्याने आई विरघळून जाईल आणि म्हणेल, " मी पुन्हा कध्धीं-कध्धीं असें करणार नाही. "

पण तसें काहीच झालें नाही, आणि सावत्र आईचा छळ मुकाट्याने सहन करणाऱ्या गरीब बिचाऱ्या गुलाबप्रमाणेच आपली स्थिति आहे असें

शशीने स्वतःची गोड समजूत करून घेतली,—म्हणजे, त्यानुसार त्याने आपला चेहेरा दुःखीदेखील केला. म्हणजे, त्याने आपली मान कलती केली, आणि हाताचा मुटका करून त्यावर गाल टेकला. खालचा ओठ पुढे काढला, आणि डोळे किलकिले केले.

सारखें गाणे म्हणणाऱ्या आणि रडणाऱ्या सिनेमातल्या छानदार बाईप्रमाणे आपण दिसत असूं अशी त्याला खात्री वाटत होती. त्याला पाहून आजी म्हणाली असती, "काय झाले राजा, तुला ? पडलास का कुठे तू ?"

पण त्याला मुकुदाचे किचाळणे ऐकू आले. "का रे मला वेडावतोस तू ? शशा-फशा कुठचा !"

शशीला धक्काच बसला. म्हणजे, त्याला केवढेतरी भयंकर दुःख होत होते—अगदी गुलाबसारखे !—आणि मुकुदाला ते वेडावण्यासारखे वाटत होतें ! शशीच्या नाजुक भावनाना फार मोठा धक्का बसला. तो तावातावाने उठला, आणि दुःख व्यक्त करण्याकरिता ज्या हाताच्या मुटक्यावर त्याने गाल टेकला होता, त्याच मुटक्याने त्याने मोहनला बदडलें.

त्यानंतर थोडा वेळ गुलाबसारखे दुःखी होणे त्याला जमलें नाही. कारण मुकुंदाच्या किचाळण्यामुळे दोन-तीन माणसें त्याचा पाठलाग करू लागलीं होतीं. आणि मान वाकडी करून आणि डोळे किलकिले ठेवून पळूं लागलें तर दरवाजावर डोके हापटण्याचा बराचसा धोका असतो.

तोंड धुताना, दात खूप पांढरे व्हावे म्हणून शशीने आपलें तोंड राखुंडीने खूप काळे केले. पण त्याला वाटलें, हे काय हे नुसते पांढरेच दात ! ताईच्या रंगाच्या पेटीतल्या वड्यासारखे दात निरनिराळया रंगाचे पाहिजेत ! आणि हात राखुंडीने बरबटलेला नसता, तर शशीने परत मुटक्यावर गाल टेकला असता.

मग शशी आजीजवळ दूध प्यायला गेला. आणि त्याला एकदम आठवले की, गुलाबला तिची सावत्र आई काही खायला देत नसे. म्हणून गुलाब बागेंत जाऊन रडत बसायची. तेव्हा बागेतली झाडे तिला गोड-गोड फळें खायला देत.

शशीला वाटलें की, आपणदेखील काही खाऊं नये, आणि वाडींतल्या बदामाच्या झाडाखाली जाऊन रडत बसावें, म्हणजे झाड आपल्याला बदाम देईल

तेवढ्यात आजी म्हणाली, " घे रे राजा दूध. " आणि तिने त्याच्या पाठीवरून हात फिरवला

शशी खालचा ओठ पुढे काढून म्हणाला, " मला नको दूध प्यायला. "

दु खी माणसें नेहमी खालचा ओठ पुढे काढून बोलतात.

" का रे नको ? "

" उगीच आपलें " शशी झाड आपल्याला बदाम देईल की नाही ही शंका विसरण्याचा प्रयत्न करीत म्हणाला.

" ही बघ आणखी साखर घातली घे आता. "

" मला नको जा. " आणि त्याच वेळेला झाडाखाली रडत बसलें तर मुलें आपल्याला हसतील आणि टपल्या मारतील ह्या भीतीने त्याच्या हृदयाला डास घेतला

आजीने त्याच्या निश्चयाचा अदमास घेतला आणि दुधाचा कप त्याच्या तोंडाला लावला. शशीने मुंडी हलवली, तोंड वाईट केलें, आणि शेवटी निव्वळ आजीच्या आग्रहास्तव तो नाइलाजाने दूध प्यायला. निदान त्याने स्वत चो तशी समजूत करून घेतली. आणि दुधाचा कप रिकामा झाल्यावर त्याने आजीचा हात झिडकारून टाकला.

बाहेर खुर्चीत बसून व टेबलावर पाय सोडून वर्तमानपत्र वाचता-वाचतां दादा इतका खाली घसरला होता की त्याच्या अंगाची होडी झाली होती.

शशीने ते पाहिलें तेव्हा त्याला खूप हसूं आलें. दादाविषयीं शशीच्या मनात उघड-उघड शत्रुत्वाची भावना होती. कारण तो न्हाव्याला शशीच्या डोक्यावरचे केस ' एकदम पातळ ' करायला सांगायचा. आणि त्याच्या फाउंटन्-पेनच्या शाईच्या बाटलीचें निळें बॉक्स् घेतल्याबद्दल त्याने शशीला मारलें होतें.

त्यामुळे शशीला खूपच हसूं आलें. तो दाराआड लपून मोठमोठ्याने हसूं लागला. दाराआड लपून हसण्यात काही अधिक मिष्किलपणा आहे असें त्याने सूक्ष्म निरीक्षणान्तीं ठरविले होतें. त्याच्या हसण्याकडे दादाने संशयी मुद्रेने पाहिलें आणि मग लहान भावंडाना अभ्यास करायला लावण्याच्या आपल्या नैतिक जबाबदारीची त्याला सोईस्करपणें आठवण झाली.

अभ्यासाचे नाव ऐकताच शशी जिन्याच्या दिशेने पळाला. तितक्यात पोस्टमन् आला नेहमीचा नव्हे हं–नवा ! आणि मोठ्याने नाव ओरडून घरात पत्र भिरकावण्याऐवजीं त्याने पत्र हसत-हसत शशीच्या हाती दिले आई उजळणी म्हणायला सागायची विसरली म्हणजे जसा आनंद व्हावा, तसा त्याला आनद झाला नाजुकपणे त्याने तें पत्र उलटेंसुलटें केले, आणि राजाच्या लालभडक मुंडक्यावरून हात फिरवला का कोण जाणे, पण राजाचें तें लालभडक मुंडकें पाहिले की त्याला बाबाच्या रागाची आठवण होई. ती आठवण विसरण्याचा प्रयत्न करीत त्याने परत त्या तिकिटाकडे निरखून पाहिलें आणि त्याला धक्काच बसला ! राजाच्या नाकावर कोणींतरी काळा ठोसा मारला होता.

शशीने थुंकी लावून तो पुसण्याचा बराच प्रयत्न केला. पण तें काही जमेना. तेव्हा बाबाच्या दोन पात्याच्या चाकूने तो खरवडून टाकावा असा त्याने विचार केला. चाकू मिळाला पण त्याने तो ठोसा खरवडला जाईना आणि शशीने जोर केला तेव्हा तो त्याच्या हाताला जोराने टोचला. आश्चर्य हें की बोट कापलें नाही.

दुर्दैवाने दादा तेवढ्यातच तेथे आला. शशीच्या हातातून त्याने खस्दिशीं पत्र ओढून घेतले. तो ओरडला, " गाढवा, बोट कापेल ना त्या चाकूने ? " आणि कळस म्हणजे त्याने शशीचें नाक जोराने ओढले.

शशीचा चेहेरा उतरला. माळ्यावरच्या श्रीखंड करायच्या पातेल्या-सारखें त्याचें मन जड झालें. सावत्र आईचा छळ मुकाट्याने सहन करणाऱ्या गुलाबप्रमाणे आपण आहोंत ह्याची त्याला परत आठवण झाली. परत त्याने

मान कलती केली आणि गुलाब जशी रडत-रडत अरण्यात गेली, तसा तो जिना उतरून वाडीच्या तोंडाशीं गेला.

तेथे बापटाचा बाळू पानवाल्याजवळ सिगारेटचीं पाकिटें मागत होता आणि आश्चर्य म्हणजे पानवाल्याने त्याला पुष्कळ पाकिटे दिलीं तेव्हा शशीदेखील पानवाल्याजवळ गेला आणि हक्काच्या स्वराने म्हणाला, " अहो पानवाले, मलापण द्या हो पाकिटें. "

दादाच्याकडून इतका अपमान सहन केल्यावर सगळ्या माणसानी आपले दु ख कमी करण्याकरिता झटलें पाहिजे अशी त्याची कल्पना होती. आईने मारल्यावर आजी त्याची समजूत काढीत नसे काय ?

पण पानवाल्याला ही भूमिका पटली नसावी कारण तो गुरकावून म्हणाला, " द्या म्हणजे ? बाजीरावच लागून गेलास कीं नाही मोठा ! "

ह्यामुळे मात्र शशीला खरोखरच दु ख झालें. त्याच्या डोळयातून खळ्ळकन् दोन अश्रू ओघळले, आणि आजीच्या कुशींत शिरून आपलें कोडकौतुक करून घ्यावें असें त्याला फार-फार वाटूं लागलें. म्हणून तो आतुरतेने घरीं येऊ लागला. पण वाटेंत बदामाचें झाड लागलें, तेव्हा त्याखाली क्षणभर उभें राहण्याचा मोह त्याला आवरेना. इतकें दु ख झाल्यावर बदामाचें झाड आपल्याला नक्कीच बदाम देईल अशी त्याला आशा वाटत होती

आणि काय आश्चर्य ! खरोखरच एक पिकलेला बदाम शशीच्या पुढ्यात पडला. चटकन् शशीने तो बदाम उचलला. रडण्याचें हसूं झालें. आणि त्याने साऱ्या जगाकडे एक तुच्छतेचा दृष्टिक्षेप टाकला. जगांतले पानवाले आणि दादा जरी त्याच्याशीं गुलाबच्या सावत्र आईसारखे वागणार असले, तरी बदामाचें झाड त्याला प्रेमाने बदाम खायला देणार होतें.

त्यानतर पुष्कळ वेळ तो बदामाच्या झाडाखाली उभा राहिला. पण बदामाच्या झाडाने काही त्याला दुसरा बदाम दिला नाही. तेव्हा परत हिरमुसला होऊन तो घरीं जाऊ लागला पण वाटेंत त्याला आठवलें की, बदाम मिळाल्यावर आपण हसलों म्हणून झाडाने आपल्याला आणखी

बदाम दिले नाहीत. ह्यामुळे बदामाच्या झाडावरचा त्याचा उडूं लागलेला विश्वास परत दृढ झाला. आणि परत कध्धी-कध्धी म्हणून हसायचें नाही असें त्याने ठरवलें.

घरीं ताई नवें पातळ नेसून आरशाजवळ उभी राहिली होती, आणि केस सारखे करीत होती. का कोण जाणे, पण ताई शशीला फार आवडायची तिचा आवाज गोड आणि मृदु होता आणि त्यात असें काही सूक्ष्म आर्जव होतें की, ती सांगेल तें शशी मुकाट्याने ऐकत असे फार काय, तिला आपला मुकादेखील घेऊं देत असे. तिचें अंग शशीच्या सकाळच्या ऊन-ऊन दुधासारखें होतें. आणि तिचे डोळे जादूच्या दिव्यासारखे होते. ती हसली की शशीला आपोआप हसूं येई, आणि तिच्या मऊ-मऊ केसाना एकदा हात लावावा अशी शशीची चोरटी इच्छा होती.

शशी उगीचच वेड्यासारखा तिच्याकडे पाहत राहिला आणि मग त्याने तिच्या पातळाच्या जरीच्या पदराला हळूच हात लावला.

झोपाळ्यावर बसून उंच झोके घेतले म्हणजे जसा पोटात खड्डा पडतो, तसें झालें. कळशींतलें पाणी डुचमळावें, तशा संवेदना त्याने अनुभवल्या.

तो हळूच म्हणाला, "ताई, तूं आमच्या पुस्तकातल्या गुलाब-सारखी छान दिसतेस !"

ताई नुसती हसली.

परत त्याने विचारलें, "ताई, तूं नेहमीं दु खांत असतेस का ग ?"

शशीच्या तोंडून इतका गंभीर प्रश्न ऐकताच ताईने त्याच्याकडे आश्चर्याने पाहिलें. आणि मग हसत त्याच्या डोक्यावरून हात फिरवत ती म्हणाली, "वेडा आहेस तूं, वेडा !" आणि ती निघून गेली.

शशी खिडकीजवळ जाऊन उभा राहिला. खिडकीच्या कडेवर त्याच्या तीन रिकाम्या काडेपेट्या होत्या. त्या त्याने हातात घेतल्या आणि मग हिरमुसलेपणाने खाली टाकून दिल्या, तीन काडेपेट्यांची आगगाडी कशी होणार ?

. .ऊंऽऽऽ बाळूजवळ मात्र खूप पेट्या. आमच्याजवळ मात्र तीनच. आम्ही आपले गरीब–गुलाबसारखे. परत मान कलती झाली, डोळे किलकिले झाले

. इतक्यात एक चकाकणाऱ्या पंखाची माशी एका काडेपेटीवर येऊन बसली. माशी नव्हती काही ती ! परी होती ती, परी !

ती म्हणाली. .ती काय म्हणाली तें ऐकण्याकरिता शशी खाली बसला

. मग तिने जादूची काडी फिरविली आणि तीन काडेपेट्यांच्या चार पेट्या झाल्या पाच झाल्या.. सहा झाल्या .अगदी खूप काडेपेट्या झाल्या.

पाहता-पाहता त्या काडेपेट्यांचीं सुरेख छोटींशीं घरें झालीं. त्या मिटुकल्या घरात खूप मिटुकलीं मुलें राहावीं. त्याचे केस सोनेरी होते, डोळे हिरवे निळे होते. आणि दाताचे रंग तर इतके वेगळे-वेगळे आणि गंमतीदार होते की प्रत्येकाचें तोंड म्हणजे रगाची पेटीच ! त्याचे हात लाल-लाल होते– माजराच्या जिभेसारखे. आणि किती खेळलें तरी त्याचे गोरे-गोरे पाय मळत नसत.

ती मुलें फार चागली होती. बापटाच्या बाळूसारखीं वाईट नव्हतीं. म्हणून त्या सगळया मुलाना शशी फार-फार आवडायचा. नेहमी नवे कपडे घालून तीं त्याच्याकडे यायचीं आणि सारखीं-सारखीं म्हणायचीं, "चल ना, शशी, खेळायला चल ना."

मग शशी हसत-हसत त्यांच्याबरोबर खेळायला जायचा. तो सगळयाना एका दमात आउट करायचा, आणि खूप पाकिटें जिंकायचा. आणि तीं पाकिटें तरी किती छान होतीं म्हणून सागूं ! वर चादीचे शंकरपाळे काढलेल्या बाबाच्या सिगरेटच्या चपट्या डबीसारखीं तीं पाकिटें असायचीं. आपल्या घराच्या खोल्या भरभरून शशीने तीं जमवून ठेवलीं होतीं.

आणि शशीचें घर इतर मुलांच्या घरासारखें काड्याच्या पेटीचें नव्हतें काही. दादाच्या फाउंटन-पेनच्या शाईच्या दौतीचें सुरेख निळें बॉक्स् होतें ना, त्याचें घर बनवून शशी त्यात राहायचा त्या घरात आई स्वयंपाक

करायची आणि रोज शशीला मोदक खायला द्यायची आजी सकाळी दूध पाजायची आणि सध्याकाळी थोपटून निजवायची आणि ताई जरीचें पातळ नेसून त्याला आपल्याबरोबर फिरायला न्यायची

छे.. छे...छे...छे! सगळेच मुळी चुकले! ह्यापैकी कोणीच त्या घरात नव्हते. फक्त गोष्टीच्या पुस्तकातली गुलाब त्या घरात होती तीच त्याला मोदक खायला द्यायची, दुधाचा कप भरून द्यायची, आणि बरोबर फिरायला न्यायची.

ही गुलाब मोठी होती की लहान होती? ती ताईसारखे जरीचे पातळ नेसायची की निळ्या साटनीचा परकर नेसायची? ही बाब जरा घोटाळ्याची होती कारण ती सोईस्करपणे कधी लहान व्हायची तर कधी मोठी व्हायची कधी साटनीचा परकर नेसायची तर कधी जरीचे पातळ नेसायची.

तिला जोरात धावतां यायचे नाही. आणि पाकिटे पण जिंकता यायचीं नाहीत. पण शशी तिला आपल्यातलीं पाकिटे द्यायचा, आणि तिच्यावर हार आली की ती आपल्यावर घ्यायचा

आणि तिने आपल्याला फळें देणारीं झाडे शशीच्या घराच्या दाराशीं आणून लावलीं होतीं शशी आपल्या घरात बसला की ती खिडकींतून फांद्या आत सरकवून त्याला बदाम, अजीर आणि आंबे खायला देत पण दुसऱ्या मुलानी कितीहि दगड मारले तरी त्याच्यावरची फळे खाली पडत नसत.

त्याच्या घराच्या गच्चीवर सगळे तुटलेले पतंग येऊन पडत. आणि आत येऊन शशी स्वत.च्या हाताने असा सुरेख मांजा बनवायचा की त्याचा पतंग कोणाला काटताच येत नसे.

एक दिवस तो असाच गच्चीवर पतंग उडवत होता आणि त्याने गुलाबच्या हातात दोरा दिला होता. इतक्यात खूप लांबच्या एका उंच काळ्या घरांतून मोठा आवाज आला. तें घर होते गिरणीच्या उंच काळ्या धुराड्यासारखें!

तो आवाज ऐकून शशी घाबरला. आणि गुलाब रडूं लागली. ती

म्हणाली, "ती माझी सावत्र आई ओरडते आहे. ती आता मला घेऊन जाईल आणि माझा छळ करील मला भाकरीसारखी चुलींत टाकील, दाराच्या फटीत माझी बोटे चेमटवील."

तशी शशीला आणि गुलाबला फार दु.ख झालें. दोघानी माना कलत्या करून हाताच्या मुटक्यावर गाल टेकले आणि डोळे किलकिले केले. बदामाचे झाड म्हणालें, "रडूं नका, रडूं नका." आणि त्याने दोघाना एक-एक बदाम दिला पण त्याना इतके दु ख झालें होतें की, त्यानी बदाम खाल्ला नाही नुसता हातातच धरून ठेवला

तेवढ्यात घराच्या पायऱ्या दणदणूं लागल्या आणि मोठमोठ्याने ओरडत गुलाबची सावत्र आई वर आली तिचे तोड होतें पोस्टाच्या लाल तिकिटासारखे तिचें पोट होते आजीच्या शिंक्यातल्या सुकलेल्या लिंबासारखें, तिचे पाय होते राउंड टेबलाच्या पायासारखे वाकडेतिकडे, आणि तिचे हात होते बाबाच्या दोन पात्याच्या चाकूसारखे.

आगगाडीच्या शिट्टीसारखा आवाज काढून ती गुलाबला म्हणाली, "चल आधी घरीं मी तुला भाकरीसारखी चुलींत टाकून भाजणार आहे!" आणि आपल्या चाकूच्या पात्यासारख्या हातानी ती गुलाबला पकडूं लागली.

तशी शशीने गुलाबचा हात धरला आणि तीं दोघे पळूं लागलीं. गुलाबची सावत्र आई त्याच्यामागून धावू लागली तिने त्याच्या अंगावर दगड फेकले पण शशी इतक्या जोरात पळाला की, त्याचे पाय कचकड्याच्या बाहुलीच्या पायासारखे ढिले झाले आणि त्याच्या पोटात दुखूं लागलें

एकदा तर तिने शशीच्या सदऱ्याचें टोकदेखील धरलें. (शशी तिला म्हणाला, "वा ग वा! तूं मला पकडायचें नाही काही. नुसतें माझ्या-मागून धावायचें" पण ती ऐकेना.) तेव्हा शशीने चटकन् मागे फिरून तिच्या तोडावर काळा ठोसा मारला. पोस्टमन् पत्रावर मारतात ना तसा. तशी ती धपकन् पडली आणि शशी परत पळू लागला.

शेवटीं तीं दोघें समुद्राजवळ आलीं तिथे एक होडी होती.

गुलाब म्हणाली, "चल आपण होडींत बसूं या, आणि खोल

पाण्यांत जाऊं या माझ्या सावत्र आईला पाण्यांत येतां येत नाही. पाण्यात गेली तर ती साखरेच्या सिंहासारखी वितळून जाईल." ( गुलाबचा आवाज ताईच्या आवाजासारखा होता. )

तेव्हा तीं दोघें होडींत बसून खूप खोल पाण्यात गेली तशी मग गुलाबच्या सावत्र आईची फाजिती झाली ती किनाऱ्यावरूनच ओरडूं लागली.

शशीला फट्कन् हसूं आलें आणि नाकावर हात धरून तो म्हणाला, "टुक् टुक् माकड."

गुलाब पण म्हणाली, "टुक् टुक् माकड."

मग तीं दोघें हसलीं. शशी गुलाबला म्हणाला, "अग, हसताना तोंडावर हात धरायचा असतो म्हणजे हसणें अधिक टोचतें"

...मग त्यानी आपली होडी खूप लाब-लाब गेली आणि समुद्राच्या टोकाशीं जाऊन आकाशाच्या टोकाला हात लावला. साटनीच्या परकरासारखें आकाश मऊ-मऊ गुळगुळीत होतें.

मग संध्याकाळ झाली. पाटीवरच्या अर्धवट पुसटलेल्या चित्रासारखें सर्व कांही दिसूं लागलें लाबचे डोंगर झोपीं गेलेल्या माजरासारखे दिसूं लागले. जगाच्या वहीवर काळ्या शाईची दौत साडली. आणि वारा आईच्या स्टोव्हसारखा आवाज करूं लागला.

तशी शशीला आणि गुलाबला फार भीति वाटूं लागली. आणि तीं दोघें जोरजोराने होडी किनाऱ्याजवळ आणूं लागलीं. पण किनारा जवळ येईना.

. खूप उजळणी लिहिल्यावर हात दुखतात ना, तसे शशीचे हात दुखूं लागले. मान ठणकूं लागली....

...हळुहळु आकाशाला उजेडाचीं भोकें पडूं लागलीं. आणि थोड्या वेळाने चादोबाची गरगरीत ताटली डोंगराच्या पोटातून वर आली. समुद्र सिगरेटच्या पाकिटातल्या चादीसारखा दिसूं लागला. आणि किनाऱ्यावरच्या झाडाना वेड लागलें...

...तितक्यात दोन-तीन मासे आले, आणि म्हणाले, "शशी, आम्हांला घे ना तुझ्या जमतींत."

शशी म्हणाला, " चले जाव. आम्हाला आता कंटाळा आला आहे."

. .मग एकदम दादा म्हणाला, " अरे शशी, ऊठ, ऊठ ! माझ्या नाकावर कशाला बसला आहेस ? "

शशीने दचकून पाहिलें तो ज्या होडीत बसला होता ती होडी म्हणजे वर्तमानपत्र वाचीत बसलेला दादाच होता

शशीला हसूं आलें अगदी खूप-खूप मोठ्याने हसूं आलें. तो ओरडला, " मग माझे नाक ओढलेंस तेव्हा ? " आणि तो मोठमोठ्याने गाणें म्हणूं लागला,

" दादाचें नाक म्हणजे बसायचें बांक. "

आपल्या ह्या कल्पनेवर शशी इतका खूष झाला की टुणकन् उडी मारून तो घरात गेला, आणि आईला म्हणाला, " आई, मला काहीतरी हातावर दे "

आई डबा उघडीत म्हणाली, " इतका वेळ काय करीत होतास रे ? "

शशीने डोकें खाजवलें, आणि मग गंभीरपणें तो म्हणाला, " मला दु ख झालें होतें "

# किडलेलीं माणसें

रविवारची दुपार होती.

मुंबईत जातीय दंग्याच्या उग्र ज्वाला भडकल्या होत्या सुऱ्याच्या हल्ल्याने निरपराध माणसाचे देह च्छिन्नविच्छिन्न होत होते जमावाच्या लढाया चालल्या होत्या मूर्ती भग्न होत होत्या. मशिदी धुमसत होत्या. आणि पोलिसाचा करडा अमल सर्वत्र जारी झाला होता

पण त्या वेळीं पेरूवाडींतील खुटमुट्याच्या चाळीतील वरच्या मजल्या-वर बरीच सामसूम झाली होती

पेरूवाडीतील खुटमुट्याची चाळ म्हणजे महाराष्ट्रातील मध्यमवर्गीय सस्कृतीचा सुपीक मळा ! त्या प्रतापशाली नोकरीबहाद्दर राष्ट्राचा शिवनेरी ! सनातन ससारधर्माचें परमपवित्र क्षेत्रस्थान !

पन्नास रुपयापासून दीडशे रुपयापर्यंत वाढत जाणाऱ्या सामाजिक मानमान्यतेच्या तेथे अनेक श्रेणी होत्या त्यातली प्रत्येक श्रेणी म्हणजे एक स्वतंत्र जात होती आणि जाती-जातींत रोटीबेटीव्यवहाराला बिलकूल मज्जाव होता.

साहेबाची मर्जी आणि पगारवाढ हे तेथील पुरुषाच्या जीविताचे केंद्रबिंदू होते. आणि नवऱ्याचा पगार व स्वत चें सौंदर्य हीं प्रत्येक बाईच्या योग्यतेचीं मापटी होतीं.

नोकरी मिळवायची, लग्न करायचें आणि मुलाचीं शिक्षणें करून पेन्शन घ्यायचें असे ह्या संसारधर्माचे चार आश्रम होते. आणि विमा उतरणें हें एक आवश्यक धर्मकृत्य होतें.

साखर आणि रॉकेल हे त्या संस्कृतीचे जळते प्रश्न होते. साहित्यिक मेळावे आणि गणपती-उत्सव हे त्या वर्गाचे सामाजिक सोहाळे होते. प्रीति-

विवाह ह्या त्याच्या अद्भुतकथा होत्या. दारिद्र्य आणि संकुचितपणा हा त्याचा पिढ्यान् पिढ्या चालत आलेला वारसा होता.

आणि सामाजिक, राजकीय व आर्थिक प्रश्नाच्या पर्वतप्राय झुंडीच्या झुंडी जरी अंगावर चालोन आल्या तरी आपली स्वयंकेंद्रित मनोवृत्ति रेसभर-देखील बदलणार नाहीं असा त्याचा आगरकरी दृढनिश्चय होता. .

अशा ह्या खुटमुट्यांच्या चाळीतील दुसऱ्या मजल्यावर जरी बरीच सामसूम झाली असली, तरी पण नटव्या मालतीबाई आपल्या बावळट नवऱ्यावर खेकसत होत्या ते स्पष्टपणें ऐकू येत होते शेजारच्याच खोलींत घारूअण्णाचा पत्त्याचा अड्डा खिदळत आणि खिंकाळत होता. तिरवे बंडोपंत आपल्या खिडकीशीं उभे राहून आपण समोरच्या चाळींतील एका सुंदर बाईकडे पाहात नाही आहोत असें दाखविण्याचा प्रयत्न करीत होते. शामराव दारात बसून आपल्या जुन्या छत्रीशी ठाकठोक करीत होते काटकुळे अजागळ ऐनापुरे हिंदु महासभेच्या राजकारणावर आपल्या किरट्या आवाजांत चर्चा करीत होते. आणि एका नवविवाहित हौशी दापत्याच्या टोकाच्या खोलीचें दार नेहमीप्रमाणे बंदच होतें

इतक्यात घारूअण्णाचा दामू गॅलरींत आला आपली चड्डी त्याने वर ओढली, आणि सदऱ्याच्या बाहीने नाक पुशीत त्याने आजूबाजूस हावरेपणाने पाहिलें. सगळी चाळ हादरेल अशी काही गुप्त बातमी मिळवावी, नाहीतर विक्षिप्त कृति करावी असले विचार त्याच्या डोक्यात शिवशिवत होते.

बंडोपंतानी नळाजवळ मोलकरणीचा हात कसा धरला आणि तिनें त्यांच्या कानशिलात कशी भडकावली ते त्यानेच घारूअण्णाना सागितलें नव्हतें काय ?

त्या हौशी दापत्याच्या बंद दाराच्या फटींतून आंत पाहण्याचा त्याने अयशस्वी प्रयत्न केला शामरावाच्याकडे नवे शिवण्याचें यंत्र आणलें आहे आणि माधवरावाच्या घरांत लाडू होत आहेत ह्या महत्त्वपूर्ण गोष्टींची, आपल्या आईला सागण्याकरिता, त्याने नोंद केली. आणि मग गॅलरीच्या कठड्यावर ओथंबून त्याने रस्त्यावर चौफेर नजर फेकली.

त्या वेळीं त्या चाळीसमोरच अशी एक घटना घडत होती की ती पाहून दामूला दोन दिडक्याचें आईसफ्रूट खाल्ल्याइतका आनंद झाला.

समोर रस्त्यावर मवाली शांतपणें एका मुसलमानाचें पादत्राणाचें दुकान फोडीत होते. त्याच्यातल्या एका लठ्ठ दादाने एका भल्या मोठ्या दगडाने कुलुपाचा कपाळमोक्ष केला दुसऱ्या चपळ पीळदार शरीराच्या पोराने हिसक्यासरशी दार उघडलें. आणि तिसऱ्या ताबारलेल्या डोळ्याच्या राकट साथीदाराने आपल्या काठीच्या फटक्यासरशी खळ्कन् साऱ्या काचा फोडल्या.

त्या आवाजासरशी सारे बघ्ये लोक दचकले. व भीतीची आणि फसल्याशा दुबळ्या आनंदाची शिणिक सगळ्याच्या शरीरांतून गेली.

आणि तें दृश्य पाहायला एव्हाना शेकडो लोक हजर झाले होते. प्रत्येक इमारतींतून डोक्यांच्या रागाच्या रागा त्या दृश्याकडे एकाग्रतेने पाहत होत्या. आणि भीतीमुळें जरी रस्ता रिकामा झाला होता, तरी त्याच्या दोन्ही टोकांना माणसाच्या झुंडी वाकून-वाकून त्या दृश्याकडे पाहत होत्या

मात्र एक गडी हातात शेणाचा गोळा घेऊन एकटाच रस्त्याच्या मध्यभागीं त्या दृश्याकडे पाहत उभा होता. आणि लोकाच्या पुंजक्यातून त्याचें तें एकट्यानेच निराळें उभें राहणें लोकाना, का कोण जाणे, चमत्कारिक वाटत होतें.

एक वेणीवाला आपला धंदा विसरून तें दृश्य पाहण्यात पार गुगून गेला होता. आणि अभावितपणें एक-एक पाऊल पुढे सरकत होता. दोन अगदी लहान मुलें घाबरून पळून जाता जाता सारख्या माना वळवून त्या दृश्याकडे पाहत होतीं. आणि एक छानछोकीचा पोषाख केलेला सुशिक्षित तरुण या सर्व लोकाकडे तिरस्काराने पाहत ऐटींत अगदी त्या फोडलेल्या दुकानाजवळून पुढे गेला.

तें दृश्य पाहताच दामू विजयोन्मादाने ओरडला, "अरे, अरे! ते पहा मवाली दुकान फोडताहेत!" त्यासरशी खुटमुड्याच्या चाळींतील दुसऱ्या मजल्यावर एकच धावपळ झाली. केवढी रोमहर्षक घटना होती ती! आणि

स्वत:च्या चाळीसमोर घडत असतांना ती घटना न पाहणें म्हणजे आयुष्यातील एका फार मोठ्या आनंदाला मुकण्यासारखें होतें.

जिथून तें दृश्य सर्वांत चागलें दिसेल अशी जागा पटकावण्याकरिता मुलात ढकलाढकली आणि मारामारी सुरू झाली, आणि अर्थात्‌च घारूअण्णाच्या भाडखोर आणि आडदांड पोरानी इतर मुलाना केव्हाच त्या जागेवरून हुसकाटलें माधवरावाचा दोन वर्षांचा शाम जेव्हा ती जागा सोडीना तेव्हा घारूअण्णाच्या बनीने थाड्‌दिशीं त्याचें डोकें गजावर हापटलें. आणि बापडा शाम जेव्हा रडत घरात जाऊं लागला तेव्हा तीं सारीं फिदीफिदी हसलीं.

इतक्यात घारूअण्णा एकदम आपल्या मुलावर खेकसले, "चला रे, चालतीं व्हा आत उनाड कुठचीं! आणि सगळयानी पुस्तकें घ्या हातात"

त्यासरशी त्याचीं सगळीं मुलें घरात पळालीं दामू मात्र तेथेच उभा राहिला ही महत्त्वाची बातमी चाळीला पुरवल्यामुळे आपल्याला कांही विशेष हक्क प्राप्त झाले आहेत अशी त्याची कल्पना झाली होती. पण घारूअण्णानी एक टपली मारून त्याची ती कल्पना दूर केली. आणि मग ते स्वत त्या जाग्यावर उभे राहून गंमत पाहू लागले.

शामराव त्याच्या शेजारीं येऊन उभे राहिले आणि "बाहेर गडबड चालली आहे तुम्ही घरात बसा" असें आपल्या बायकामुलाना दरडावून सागून काटकुळे अजागळ ऐनापुरे कठड्याजवळ धावले त्याच्या मनाची इतकी धादल उडाली होती की कठड्याजवळ जाण्याकरिता ते उघड-उघड धक्काबुक्की करूं लागले आणि शेवटीं शामरावाच्या बगलेंतून मान काढून ते ते दृश्य पाहूं लागले.

शामराव दयाबुद्धीने म्हणाले, "अरे, अरे, काय बिचाऱ्यांचें नुकसान करताहेत!"

त्यासरशी ऐनापुरे एकदम आपल्या किरट्या आवाजात किंचाळले, "हेंच-हेंच तें चुकतें तुमचें. ह्या मुसंड्याना काय म्हणून दया दाखवायची? ते आमच्या बायका पळवतात, पोरें बाटवतात, देवळें भ्रष्ट करतात तेव्हा? काही नाही, त्याना असाच हात दाखवला पाहिजे."

त्याच्या त्या आवेशाने काहीसे गांगरलेले शामराव म्हणाले, " अहो, पण हें भांडण थांबायला नको का कधी ? शेवटीं आपल्याला सगळ्याना एकाच ठिकाणीं राहायचें आहे ना ? "

पण ऐनापुरे आपला आवाज तारसप्तकात नेऊन किंचाळले, " कसलें एके ठिकाणीं राहायचें ? आम्ही अविंधाचा नि:पात करू, त्याचीं डोचकी ठेचू. " आणि त्यानी असे काही हातवारे केले की शामराव अगदी घाबरून गेले.

आपल्या भयंकर राजकीय मतानी शामरावाना घाबरवून सोडण्यात ऐनापुऱ्याना फार आनंद वाटे आपली चिरडली गेलेली अधिकारलालसा पुरविण्याचा त्या दुबळ्या माणसाचा तो एकच मार्ग होता

" कसली राजकारणाची चर्चा करताय्, ऐनापुरे ? आमच्या पगारात चार रुपये वाढ होईल असलें एखादें राजकारण असलें तर सांगा," घारूअण्णा म्हणाले. आणि आपण काहीतरी विलक्षण मुरब्बीपणाचें बोललो अशा आशयाने त्यानी सर्वांकडे पाहिलें.

सर्वाना त्याचें म्हणणें मनोमन पटलें आणि म्हणूनच तें कोणालाच आवडलें नाही.

नटव्या मालतीबाईदेखील ते दृश्य पाहायला लगबगीने बाहेर आल्या होत्या. पण त्या गर्दीत धक्काबुक्की करून कठड्याजवळ जायला आणि स्वत:ची ऐट बिघडवायला त्याचे मन धजेना. सौंदर्य आणि योग्यता ह्यानी आपण इतरांहून श्रेष्ठ आहोत अशी त्याची प्रामाणिक समजूत होती लोक ही गोष्ट मानीत कसे नाहीत ह्याचें त्याना नेहमीच आश्चर्य वाटे व इतराना नाक मुरडून आणि नावें ठेवून आपलें श्रेष्ठत्व सिद्ध करण्याचा त्याचा प्रयत्न नेहमी अट्टाहासाने चाललेला असे आतादेखील त्या असेंच काहीतरी पुटपुटत होत्या. आणि नेहमीप्रमाणेच सर्व लोक त्याच्याकडे दुर्लक्ष करीत होते.

इतक्यात तिरवे बंडोपंत बावळटपणाने चालत आले आणि चटकन् त्याना धक्का देऊन पुढे गेले.

मालतीबाई चमकल्या. बंडोपंतानी हें मुद्दाम केलें ह्याची त्याना खात्री होती आणि बंडोपंताविषयी त्याना नेहमीच जो विलक्षण तिरस्कार व सताप वाटत असे त्याने त्याच्या मनात जोराची उसळी खाल्ली त्याना वाटले की चटकन् घरात जावे पण, का कोण जाणे, त्याना त्या जागेवरून हलावेसें वाटेच ना स्वत.वर त्या विलक्षण जळफळल्या. आणि आपल्या काकदृष्टीने त्याच्याकडे अधाशीपणे पाहणाऱ्या बंडोपंताचें डोकें खोबऱ्याच्या वाटीसारखें ठेचावे इतका त्याना त्वेष वाटला पण तरी जाग्यावरून हालायला त्याचें मन तयार होईना

रस्त्यातून येता-जाता बायकाना धक्के द्यायची बंडोपंताना चमत्कारिक सवय होती आणि हे कसें साधता येईल हेच विचार त्याच्या डोक्यात सतत चाललेले असत ह्या बाबतींत त्याचे जे बेत चालत ते इतके सूक्ष्म, धूर्त आणि निर्लज्जपणाचे असत की पुष्कळदा त्याना स्वत चीच किळस वाटूं लागे पण त्या क्रूर सवयीपुढे त्याचे काही चालत नसे.

मालतीबाईचा दुबळेपणा त्या सराईत माणसाने ताबडतोब ओळखला. आणि आता अधिक आत्मविश्वासाने त्याना धक्का देऊन तो पलीकडे गेला

तरी मालतीबाई स्वत वर जळफळत जाग्यावरच उभ्या राहिल्या, मग अशी कुठची सुप्त जबरदस्त इच्छा त्याना त्या जाग्यावर खिळवून धरीत होती कोण जाणे...

इतक्यात नेहमी बंद असणारें त्या हौशी जोडप्याच्या खोलीचें दार उघडलें, आणि मनोहर व लीला बाहेर आलीं

त्या दोघाच्या पायात चपला होत्या आणि हातांत हातरुमाल होते. चाळींतील इतर लोकाहून आपण आधुनिक, नीटनेटके व स्वच्छ आहोंत हें दाखविण्याकरिता तीं दोघें असें वागत गॅलरींत एखादे शेंबडें मूल दिसलें की लीला एकदम "ई ऽऽ" म्हणून किंचाळायची. आणि एखाद्या बाईच्या अंबाड्याचें टोक सुटलेलें असलें तर लोकाना दिसेल अशा रीतीने चोरून हसायची सवय तिने स्वत ला लावून घेतली होती.

मनोहर एकदा कॉलेजच्या क्रिकेट टीममध्ये खेळला होता. त्यामुळे

त्याच्या तोंडात नेहमी क्रिकेटची भाषा असे आणि चाळीच्या गॅलरींतून जाताना कधीकधी तो गोलंदाजी केल्याचा आविर्भाव करीत असे

खाली काय चाललें आहे ते त्याना दिसेना म्हणून मनोहरने घरातून चटकन् एक खुर्ची आणली आणि तिच्यावर उभा राहून तो लीलाला खाली काय चाललें आहे ह्याचें आपल्या मताने विनोदी वर्णन सांगायला लागला

ते ऐकताना लीला मान वेळावून आणि इतर अनवश्यक हावभाव करून काही उद्गार काढीत होती

शेवटीं मनोहर लीलाचा हात धरून म्हणाला, "तू राहा ना इथे खुर्चीवर उभी म्हणजे दिसेल तुला नीट."

तेव्हा लीला लाजत-मुरकत मनोहरच्या शेजारीं खुर्चीवर उभी राहिली

एव्हाना त्या जोडप्याचा उद्देश सिद्धीस गेला होता कारण खाली फोडल्या जाणाऱ्या दुकानाऐवजीं सारे लोक माना वळवून बावळटपणाने त्याच्याकडेच पाहू लागले होते.

तेव्हा लीला फणकारली, "चहाटळ मेले !" आणि मग दोघानी घरात जाऊन परत दार बंद करून घेतलें.

त्याचें दार बंद झालें अशी खात्री झाल्यावर घारूअण्णा म्हणाले, "दुकान फोडण्याऐवजीं हे मवाली काही लोकाचीं थोबाडें का फोडत नाहीत कोण जाणे !"

त्याबरोबर सगळ्या लोकांना अगदी मनापासून हसूं आलें. कारण सर्वांनाच त्या जोडप्याची फार असूया वाटत असे. आणि आपणहि त्याच्या-सारखेंच व्हावें असें वाटे . पण त्याच्यासारखी रूपाची आणि तारुण्याची देणगी कोणालाच नव्हती. आणि सर्वांचेच संसार वाढलेले असल्यामुळे त्यांच्याइतक्या ऐटीने कोणालाच राहता येत नसे.

इकडे दुकान फोडण्याचें काम व्यवस्थितपणें चाललें होतें. दुकानांतल्या काही जिनसा मवाली भराभर बाहेर फेकीत होते. आणि काही स्वतःकरिता गोळा करीत होते.

प्रत्येक बाबतींत सर्वांच्यापुढे असावे अशी महत्त्वाकांक्षा धरणारा दामू एव्हाना त्या फोडलेल्या दुकानाच्या अगदी जवळ जाऊन उभा राहिला होता. त्याच्या अंगात शर्ट नव्हता पण त्याची त्याला मुळींच फिकीर नव्हती आपल्या कर्तबगारीचा त्याला विलक्षण अभिमान वाटत होता दूर उभे राहिलेल्या इतर लोकांकडे पाहून तो तिरस्काराने हसत होता आणि आपली शेंडी डोक्यावरून नाकापर्यंत ओढीत होता

इतक्यात एक भैय्या आपल्याच बेफिकीर तंद्रींत पुढे आला. रस्त्यावर दुकान फोडलें जात आहे ह्याची त्या बेट्याला जाणीवहि नव्हती पण त्या दुकानाजवळ जाताच समोर पडलेल्या पादत्राणाच्या राशीकडे त्याचे ल: गेलें

त्यासरशी त्याने अगदी सहजपणें आपले फाटके चढाव काढून त्या राशींतले चांगलेसे बूट आपल्या पायात चढवले. आणि दोन-चार बुटांच्या जोड्या खाकोटीस मारून तो आनंदाने हसत पुढे चालूं लागला.

त्या भय्याचें तें कृत्य पाहून सारे लोक एकदम अगदी मनापासून हसले कारण सगळयाच्या मनातल्या सुप्त इच्छेला त्या साध्यासिध्या भय्याने मूर्तस्वरूप दिलें होतें

भय्याच्या त्या कृतीने इतरानाहि हळुहळू धीर आला हातात शेणाचा गोळा घेऊन रस्त्याच्या मध्यभागीं उभा राहिलेला रामा गडी पुढे सरसावला आणि दोन-चार पायतणाचे जोड बगलेंत मारून त्याने रस्ता सुधारला अभावितपणें पुढे सरकणाऱ्या वेणीवाल्यानेदेखील घाबरत-घाबरत त्याचें अनुकरण केलें.

त्यानंतर सारेच लोक हळुहळु पुढे सरकले आणि मग तीं पादत्राणें पळविण्याकरिता एकच गिल्ला झाला.

ती लुटालूट पाहून ऐनापुरे अभावितपणें कठडा सोडून घाईने जिन्याकडे वळले.

तशी धारूअण्णा चटकन् फिरून छद्मीपणाने म्हणाले, "काय ऐनापुरे, तुम्हींहि निघालेत की काय लूट करायला ?"

त्यासरशी आपण काय करीत आहोत ह्याची ऐनापुऱ्यांना जाणीव झाली, आणि आधीच बावळट असलेला त्याचा चेहेरा अगदीच अजागळ दिसूं लागला.

इतक्यात घारूअण्णाचा दामू दडदडत वर आला. त्याच्या हातात एक बुटाचा जोड होता तो ओरडत घारूअण्णाना म्हणाला, " अण्णा-अण्णा, हे पहा मीं बूट आणलेत "

घारूअण्णा प्रसगावधान राखून म्हणाले, " अरे मूर्खा, अशा रस्त्यावर पडलेल्या गोष्टी का आपण उचलायच्या ? ..बरें पण असू देत ते बूट आता नाहीतर परत त्या गर्दीत सापडशील तूं "

आणि सर्व लोकाच्याकडे एक निर्लज्ज दृष्टिक्षेप टाकून ते घरात गेले व तो बूट आपल्याला होतो की नाही तें पाहू लागले

दामूला आता अधिकच जोर चढला आणि आईने दिलेली एक भलीमोठी पिशवी घेऊन तो खाली पडला

तें पाहून राधाबाईंना फार हेवा वाटला आणि दामूइतकेच वय असलेल्या आपल्या मधूला सारखें बोटाने डिवचीत त्या म्हणू लागल्या, " जा. खाली जाऊन ये जा. तो दामू पहा कसा हुषार आहे तो नाहीतर तूं ! "

पण नाजुक मनाच्या मधूला ती कल्पना मानवण्यासारखी नव्हती. त्यामुळे तो शेवटी कंटाळून दूर पळून गेला आणि पिपाआडच्या कोपऱ्यात लपून बसला.

दामू खाली गेला तेव्हा लुटालूट ऐन रगात आली होती. सगळे लोक एकमेकाना ढकलत होते, ओरडत होते, भाडत होते, मारामारी करीत होते, आणि हसतदेखील होते.

त्या गिल्ल्यात जाणूनबुजून सापडलेल्या एका म्हातारीची पार दामटी वळून ती किंचाळत होती.

प्रत्येकजण ओरडत होता, " अरे-अरे, त्या म्हातारीला सोडवा. " पण धक्काबुक्की करायचा कोणीच थांबत नव्हता.

त्या दंगलीतदेखील दामूने शिताफीने आपली पिशवी भरली आणि तो परत येऊं लागला इतक्यात एका दाडग्या मवाल्याने त्याच्या हातातली पिशवी हिसकून घेतली, आणि तो निघून जाऊं लागला. दामू त्याच्यामागे धावत ओरडूं लागला, " हे काय ? हें काय ? "

तें ऐकून तो मवाली मागे फिरला. आणि त्याने दामूच्या फाड्दिशी थोबाडीत मारली दामूचें कानशिल लाल झालें त्याच्या डोळ्यातून पाणी आलें. आणि त्याचें डोके गरगरूं लागलें

कसेंबसें घरी जाऊन त्याने आपली हकीकत सागितली

आणि पिशवी हरवल्याबद्दल घारूअण्णा त्याच्यावर खेकसले मात्र !

इतक्यात पोलिस येत असल्याची वर्दी लोकाना मिळाली. मवाली ताबडतोब गुप्त झाले इतर लोक सैरावैरा धावूं लागले.

आणि सोबत दोन-चार बायका आणि बरींचशी मुलें घेऊन जाणारा एक कारकून घाबरून त्या मवांच्यापुढे धावत आणि मागे न बघता ओरडत होता, " अरे, अरे, जोराने पळा. पाय मोडले की काय तुमचे ?..."

# क्षुल्लक गोष्ट

दोन वाजले,

अडीच—

तीन—

अनताची थकलेली नजर पुन्हा एकदा घड्याळाकडे वळली.

त्या जुनाट घड्याळाच्या बुरसलेल्या तबकडीवरून ताबलेला काटा सावकाश पोक्तपणाने पुढे सरकत होता

जणु घाई, आश्चर्य, साहस असलें काही जीवितात नव्हतेंच !

जणु त्या खोलींत निमुटपणें राग धरून बसलेल्या वयस्क टेबलाप्रमाणे आणि म्हातारड्या खुर्च्याप्रमाणे जीवितातल्या साऱ्या घटना होत्या !

जणु त्या टेबलावरील नियमदुरुस्त्या आणि पुस्त्या ह्यानी भरलेल्या मळकट पिवळ्या कागदाच्या चवडीतच जीविताचा सारा इतिहास सामावला होता '

पलीकडच्या साहेबाच्या खोलींतून कपबशाचा नाजुक किणकिणाट ऐकूं आला, व हास्याचे फवारे उसळले आणि समोरच्या इमारतींतील रेडिओवरून पाश्चात्य संगीताचे नाचरे सूर सूर्यप्रकाशाप्रमाणे त्या खोलींत आले.

अनंताने उगीचच अस्वस्थ हालचाल केली, रुमालाचा चोळामोळा केला, आणि वेदना झाल्याप्रमाणे त्याच्या चेहऱ्याचे स्नायू आकुंचित झाले. त्याने मुद्दाम असें केलें नाही. पण आज कित्येक वर्षे अशा अस्वस्थ हालचाली करायची सवय त्याला जडली होती. त्याच्या जीवितातील असंतोषाने व्यक्त होण्याकरिता हा विचित्र मार्ग पसंत केला होता

अनंताला कधीच कळलेलें होतें की व्यक्त होण्याइतकीदेखील आपल्या असंतोषाची किमत नाही आणि खरें म्हटलें तर तसें काही विशेष झालेंच नव्हतें. एका महत्त्वाच्या पत्रावर साहेबाची सही घेऊन ते पाठवायचें

होतें. आणि साहेबाच्याकडे कोणी माणसे आल्यामुळे त्याला तीन वाजेपर्यंत बसावें लागलें होतें शनिवार होता तरी !

आणि एवढ्या लहानशा कारणावरून त्रासणें म्हणजे किती वेडेपणाचें होते !

शिवाय, त्याला तरी अशी विशेष घाई कुठे होती ? घरीं जाण्याबद्दल म्हणाल तर त्याला त्याची मुळीच उत्कंठा नव्हती दोन चिमुकल्या खोल्यात अडचणीने सामावलेल्या चार लहान भावंडाच्या संसारात, निवांतपणें बसायला त्याला दोन विती जागादेखील नव्हती, आणि मायेच्या उबेपेक्षा दारिद्र्याची झळच त्याला तेथे अधिक जाणवली असती

चालले होते ! रडत–रखडत–कोठेतरी !

ह्या विषयावर आता विचार करायचेंच त्याने सोडून दिले होते आपल्या जीवितातील घटनाचा काही सुसंगत अर्थ लावता येईल हे त्याला शक्यच वाटत नव्हतें. आणि दु खाचे आणि दुर्दैवाचे तडाखे मधूनमधून आपल्याला का मिळतात हेहि त्याला समजले नव्हते त्याला फक्त इतकेच कळलें होते की सहन केलें पाहिजे–कुरकुर न करता–अगदी मुकाट्याने

तो कॉलेजात होता तेव्हा त्याची वृत्ति ह्याहून किती वेगळी होती ! तेव्हा त्याच्या अंगात रग होती, उत्साह होता, आशा होती ! खूप अभ्यास करावा, मार्क मिळवावे, पुढे सरकावें, विद्वान् व्हावें, असे रेखीव चित्र त्याच्या नजरेसमोर होतें. आणि त्याचा मार्ग किती सोपा होता ! बस् ! खूप वाचायचें, खूप विचार करायचा, खूप लिहायचें !

पण बी ए च्या परीक्षेत काय झालें कोण जाणे ! तो जेमतेम सेकंड क्लासमध्ये आला. त्याने अभ्यास व्यवस्थित केला होता पेपर उत्तम लिहिले होते. पण काहीतरी कुठेतरी बिघडलें होतें. दोरीवरून नेहमी सफाईने चालणाऱ्या माणसाचा मध्येच तोल सुटावा ना, तसे झाले होतें

आयुष्यातली अपयशाची पहिली चुणूक त्याला मिळाली होती पण त्याची रग कायम होती. आणि त्याने ठरवले की एम् ए.ला फर्स्ट क्लास मिळवायचा. आणि तो परत अभ्यास करायला लागला.

पण ह्यापुढे त्याला अधिक संधि द्यायची नाही असें दैवाने ठरवलें होतें आणि एम् ए च्या पहिल्याच वर्षी त्याचे वडील वारले थोडासा ताप आला. तिकडे दुर्लक्ष झाले आणि चटकन् दुखणें गंभीर होऊन त्याचा अंत झाला. घराचा आधारस्तंभच तुटला. आणि अभ्यासावर पाणी सोडून स्वत चा, चार भावंडाचा आणि आईचा चरितार्थ चालविण्याकरिता तो नोकरी शोधायला निघाला.

आणि मग इतर अनेक तरुणाच्या बाबतीत जें होतें तेच त्याच्या बाबतीत झालें जगाच्या बाजारात कॉलेजातल्या ज्ञानाची किंमत किती कमी आहे तें त्याच्या नजरेस आलें

कॉलेजच्या चिमुकल्या जगात त्याने वक्तृत्वसभा गाजवल्या होत्या, बक्षिसें मिळवलीं होतीं. पण बाहेरच्या जगात ह्या सर्व गोष्टींची किंमत शंभर रुपये होती फक्त शंभर रुपये !

आणि शंभर रुपयात आता सहा माणसाचा उदरनिर्वाह होत होता. त्यातच अडचणी, त्यातच हौस, आणि त्यातच मौज पण माणसाची जात अशी कोडगी की त्यातहि सारीं जगतात खुशालीने ! मजेंत !

अनंताची शोककथा अशी अगदी सोपी आणि साधी होती तिथे सामाजिक प्रश्न नव्हते, उत्तुंग ध्येयवाद नव्हता, गूढ घटना नव्हत्या. तरुण कोवळ्या मनाच्या साध्या गोड इच्छा होत्या, आणि परिस्थितीने त्या कोळपून गेल्या होत्या.

आता शंभर रुपयाची तो नोकरी करीत होता कटाळवाणे, किचकट कारकुनी काम त्याच्याकडून करून घेतलें जात होतें. आणि लोक त्याला विचारीत, " काय, अनंतराव, आता लग्न केव्हा करणार ? " आणि ह्यावर तो नुसता हसून मान हालवीत असे.

ठीक चाललें होतें एकंदरींत.

अर्थात् मनात काहीतरी खुपत होतें. पोटांत खोल कोणीतरी रडत होतें. पण असल्या नाजुकसाजुक दु खाना ह्या ॲटम बॉंबचा शोध लावणाऱ्या जगात औषध नाही.

इतपत चाललें असतें तरी ठीक होते. पण सध्या एक नवीनच प्रश्न निर्माण झाला होता त्याच्याहून जरा लहान असलेल्या त्याच्या बहिणीच्या जीवितावर एक मोठा आघात झाला होता.

अगदी साधी गोष्ट. अनंताचा एक मित्र होता आनदी, हुशार, चुणचुणीत! तो अनताकडे नेहमी येत-जात असे आणि तो आला म्हणजे अनंताच्या बहिणीची कळी खुलायची आणि अनंताची बहीण घरात नसली म्हणजे तो खट्टू व्हायचा आणि सर्वांची अशी समजूत झाली होती की त्या दोघाचें लग्न होणार पण एम् बी , बी एस् झाल्यानंतर त्या मित्राला इंग्लंडला पाठवायला तयार असणारा एक मुलीचा बाप भेटला आणि तेवढ्या आमिषाला अनताचा मित्र भुलला

दुर्दैवाचा हा आघात ज्या व्यक्तीवर झाला ती व्यक्ति तो सहन करण्यास मुळीच समर्थ नव्हती माणसाच्या जातीचा कोडगेपणा हा मोठा गुण तिच्याजवळ मुळींच नव्हता.

ती बातमी ऐकल्यावर ती रडली नाही अगर ओरडली नाही वडील वारल्यापासून घरातल्या कर्त्या स्त्रीची भूमिका तिने जितक्या निरलसपणाने आणि प्रेमळपणान केली होती तशीच ती अजून करीत होती आजारी थकलेल्या आईची तशीच शुश्रुषा चालली होती पण तिच्या चेहऱ्यात विलक्षण फरक पडला आणि ती अगदी अबोल झाली

ह्या गोष्टीला अनत खूप घाबरला आणि आपल्यापरीने त्याने तिचें दु.ख हलकें करण्याचे पुष्कळ प्रयत्न केले पण तिच्या स्वभावाची घडणच अशी होती की ह्या प्रयत्नामुळे ती अधिकच दु.खी होई.

आणि दुसरें काही करणें अनंतला शक्य नव्हतें त्या मित्राला द्यायला दहा हजार रुपये त्याच्याजवळ नव्हते. फक्त त्या मित्रावर खूप संतापणे त्याच्या हातात होते पण त्याचा काय उपयोग होता? आणि एका दृष्टीने बरोबरच होतें की त्या मित्राचें करणे! असली संधि आयुष्यात क्वचित्‌च येते. ती सोडून द्यायची म्हणजे किती मूर्खपणाचें होतें बरें!

तसें पाहिलें तर जगात कोणाचेंच फारसें चुकत नव्हते पण दु खें मात्र वाढत होती आणि सारे ती असहायपणे सहन करीत होते.

अनंतने सुस्कारा सोडला नुसती दु खाची उजळणी करण्यात काय अर्थ होता ?

असाच थोडा वेळ गेला आणि मग कुठल्याशा अज्ञात अंतस्थ प्रेरणेने तो उठला जणु तुरतेच आपण आपले काम आटपलें आहे अशा थाटात त्याने कागद आवरले आणि कोपऱ्यातली छत्री घेऊन आणि घड्याळाकडे नजर टाकून तो घरीं निघाला

आपल्याला एका महत्त्वाच्या कागदावर साहेबाची सही घ्यायची आहे हे तो अजिबात विसरूनच गेला त्याच्या मनाच्या अज्ञात भागात काहीतरी लुच्चेगिरी झाली होती, आणि तिचा त्याला पत्ता नव्हता

जिना उतरताना त्याच्या मनात आलें, 'आता काय करावे बरें ?' एक उत्तर असे सुचलें की बहिणीला घेऊन सिनेमाला जावें म्हणजे तितकेंच तिचे मन हलके होईल. पण ताबडतोब त्याला वाटलें की 'नको, नको आता काही नको. संध्याकाळी–उद्या पाहिजे तर पण आता थोडी मोकळी हवा मिळूं दे. थोडे दु खापासून दूर जाऊं दे' इतका तो दु.खाला आणि दगदगीला अलीकडे त्रासला होता आणि भिऊ लागला होता

आणि मग तो असाच पुढे चालू लागला कसलीतरी आळसट विचारमालिका डोक्यात चालली होती " खरेंच, मोटारीच्या मागच्या बाजूचा तांबडा दिवा किती छान दिसतो, नाही ? जणु स्त्रीने आपल्या सुंदर अंबाड्यात खोवलेलें ऐटबाज गुलाबाचें फूल अ ?–नोटाचें पुडकें... म्हणे कॉमनसेन्स् क्रॉसवर्ड् सोडवा . अरेच्या ! परवा मी पाठवलय् की एक सोडवून. त्या पारर्याच्या नादाला लागून.. दीड रुपया गेला मात्र...पण कोणी सागावे ?...अ ? कॅफे आयडिअल् छे ! कॅफे आयडल् असें नाव पाहिजे ह्याला...कसे अगदी आळशी आहे बेटें...खुर्च्यासुद्धा अशा आहेत की वाटतें आळशीपणाने बसून राहावे तासन्तास...चहा मागवला तरी सावकाश पंधरा मिनिटानी मिळतो...घ्यावा का चहा ?...अं...तसा नको बुवा...नाजुक

गोरा हात चट्टा बनवतो आहे...चमच्याचा, बांगड्याचा, बोलण्याचा आणि हसण्याचा किणकिणाट होतोय्.. आणि आपण अगदी आळशीपणाने बसून कसल्यातरी गोड ऊबदार तंद्रीत तिच्याकडे पाहात आहोत...

.आळशी, गोड, ऊबदार...

समोरून एक बायकी छत्री चालली होती, आणि नाजुक पावलें, सुंदर चेहरे न्याहाळण्याची अनंतला सवय होती म्हणून तो झटकन् पुढे झाला, आणि त्याने मुरडून तिच्याकडे पाहिले आणि मग तो काहीसा ओशाळला

त्याच्यासमोरच राहात असे की ती ! काय बरें नाव तिचे ?–हं. तारा आणि थोडीशी ओळखहि होती त्याची म्हणजे नमस्कार-चमत्कारावर आधारलेली नव्हे आपली निराळीच म्हणजे त्याचे असे झालें होतें की त्याला एकदा खूप मोठ्याने गाताना पाहून ती खुदकन् हसली होती, आणि तिला तुळशीला अगदी भाविकपणें नमस्कार करताना पाहून तोहि खदखदा हसला होता दिवाळीच्या वेळेला तिने एक छोटा आकाशकंदील बाहेर लटकावला होता आणि तें पाहून अनताने खूप मोठा आकाशकंदील खूप उंचावर फडकावला होता.

आणि एकदा रस्त्यात त्याने तिचें एका मैत्रिणीबरोबरचें संभाषण ऐकलें होतें

मैत्रीण म्हणत होती, "मला नाही बाई पुरुषानी बुश् शर्ट् घातलेला आवडत ! "

त्यावर तारा जोराने म्हणाली होती, "मला आवडतो बाई ! आमच्यासमोरचा एक मुलगा घालतो इतका छान..."

तिला पाहताच ह्या साऱ्या विचारानी त्याच्या मनात गर्दी केली. सरबत शिपडलेले बर्फाचे गोळे विकणाऱ्याची गाडी पाहिली म्हणजे छोटीं मुले भोवती गर्दी करतात ना, तशी

ओशाळलेल्या स्थितींतच तो पुढे चालूं लागला. तशी ती मोठ्याने हसली. अगदी चावटपणाने हसली.

त्याला खूप राग आला तिचा. आणि मग मागे वळून तोदेखील हसला आणि थांबला.

ऑफिसमधून घरीं जाणाऱ्या एका कारकुनाने भुवया उंचावल्या. डोक्यावर ओझें घेऊन झपाझप जाणाऱ्या एका हमालाची चाल मंदावली.

त्या दोघानीहि तें पाहिलें. आणि तीं संकोचली चालताना त्याचा स्पर्श तिला झाला. तशी ती दूर सरकली, आणि मग तोहि अधिक दूर सरकला.

मग त्याने काहीसा बावळट प्रश्न तिला विचारला.

तिने सकोचाने उत्तर दिलें.

थोडा वेळ असेंच चाललें. आणि मग काय झाले कोण जाणे ! चेहरे फुलले संभाषण रगलें. हास्याच्या प्रसन्न सरी आल्या विनोदाचा पूर लोटला.

परत त्याचा स्पर्श तिला झाला पण ती दूर झाली नाही. तो संकोचला नाही.

...अगदी त्याला हवें होतें तशी ती आता बसली होतीं गोरा नाजुक हात चहा बनवत होता. गोड किणकिणाट ऐकू येत होता–चमच्याचा, बांगड्यांचा, बोलण्याचा, हसण्याचा

आणि अगदी आळशीपणाने एका गोड, ऊबदार तंद्रींत गुरफटून तो बसला होता. व थंडीच्या दिवसात जागें झाल्यावर, पांघरुणाच्या उबेंत गुरफटलेले असतांना आपण जशी खिडकीबाहेरच्या धुक्याकडे सुस्तावलेली नजर टाकतों, तसा तो तिच्याकडे पाहात होता

त्या रम्य जाणिवेपलीकडे त्याला आता कशाचेंच भान नव्हतें एखाद्या दुखऱ्या जखमेचा ठणका थांबावा अगर डोळयातला केर निघावा तसें त्याला वाटत होतें.

त्याच्या जीवितांतल्या साऱ्या मोठ्या इच्छा आणि आकांक्षा आता कोळपल्या होत्या. त्याच्या दुखऱ्या मनाला आता फक्त सहानुभूति, ओलावा, प्रेम पाहिजे होतें. आणि तेंच नेमकें त्याला गवसलें होतें.

त्याला आणखी काही नको होते. आणि जें मिळालें आहे तें मात्र हिरावले जाऊं नये म्हणून तो कोणाचीतरी मनोमन प्रार्थना करीत होता.

तसें पाहिलें तर त्याला काय मिळालें होतें ? का घर, का दार, का संपत्ति ? फक्त एका हसऱ्या मुलीची सहानुभूति पण तरी त्याला निराळेंच वाटत होतें. ज्याचा शोध आपल्या नकळत आपलें मन करीत होतें तें हेंच असें त्याला एकदम वाटलें.

खिडकीच्या काचेतून पावसाकडे पाहताना, किनाऱ्यावर उभे राहून क्षितिजावरचीं शिडे पाहताना, दुरून येणारे अस्पष्ट संगीताचे स्वर ऐकतांना, जी एक हुरहूर त्याला वाटे, ती आता थांबली होती

जीवितातील दु खे आणि कटकटी त्याच्यापासून दूर झाल्या होत्या असें थोडेंच होतें ? घरी गेल्यावर त्याला धावतपळत डॉक्टरचें औषध आणायचे होते, कोणी दूरचे काका मुंबईत आले होते त्याना जाऊन भेटायचें होतें, शेजारच्या चष्मेवाल्या साऱ्यानी " आमच्याकरिता मित्राकडून सिनेमाचा पास आणलात का ? " असा निर्लज्ज प्रश्न त्याला विचारलाच असता, आणि त्याच्या छोट्या गोंडस भावानेदेखील " नवा कोट आणला का ? " असा केविलवाणा प्रश्न त्याला विचारला असता.

पण ह्या साऱ्या गोष्टी जणु आता त्याला स्पर्शच करूं शकत नव्हत्या.

आणि एकदम सुई टोचल्याप्रमाणे त्याला आठवण झाली की तें पत्र पाठवायचें होते धडपडून तो उठला गडबडीने आणि अजीजीने त्याने तिचा निरोप घेतला.

अजून खूप बोलायचें होते, खूप स्तब्ध बसायचें होतें, आणि हातांत हात गुफून दूरवर जायचे होते पण ते आता शक्य नव्हतें आणि मनाच्या गाठीभेटी अशा विचित्र असतात की त्या पुन्हा घडवून आणता येतातच असें नाही.

एका क्षुल्लक कारणाने त्याला एक फार मोठें सुख मिळालें होतें. आणि तितक्याच क्षुल्लक कारणाने तें संपुष्टात आलें होतें.

असल्या क्षुल्लक गोष्टींची आपल्या जीवितावर इतकी हुकमत चालावी ह्याची त्याला चीड आली, आणि हसूंहि आलें.

एक पत्र. एक साधी चिठ्ठी. आणि तिच्याकरिता अनंतच्या आयुष्यात उलट्यापालट्या घटना होत होत्या.

धावतपळत तो ऑफिसात गेला. अर्थात् त्याने अपेक्षिल्याप्रमाणेच सारें झालें होते. साहेब निघून गेले होते, आणि शिपाई कुलूप लावून घरी गेला होता. आणि दोघाचेहि पत्ते अनतला माहीत नव्हते.

अनंतने कपाळावरचा घाम निपटला, आणि तो परत खाली उतरला आणि तितक्यात त्याच्या शेजारचा बंडू कुठूनसा धावत, घामाने निथळत त्याच्यासमोर येऊन उभा राहिला

अनंताने आश्चर्याने त्याच्याकडे पाहिले. तो काहीसें गोधळलेलें बोलला. अनंताने चपापून त्याला प्रश्न विचारला त्याने कसेंबसें उत्तर दिले

आणि अनंताचा चेहरा एकदम पालटला त्याच्या कपाळावर घाम फुटला. अग थरथरा कापूं लागलें पोटात विलक्षण रिकामे-रिकामे वाटूं लागलें

...अनंताच्या बहिणीने आयोडीन प्यायलें होते, जाणि ती मृत्यूच्या दारात होती...

आणि मग धावत-पळत तो घरीं निघाला एका टॅक्सीला त्याने हात केला पण तिच्यात एक फॅशनेबल जोडपे चटकन् चढून बसले, आणि ती फुर्रकन् निघून गेली. आणि मग पाच मिनिटे बस, गाडी, ट्रॅम काहीच आले नाही चिडून तो पायीच चालूं लागला–नव्हे, धावू लागला पण तितक्यात पाऊस पडूं लागला आणि छत्री कशीबशी सावरीत आणि आत बडूला घेऊन तो पुढे जाऊं लागला.

मध्येच कुठच्याशा मित्राने त्याला थाबवले आणि हसत-हसत आपण कुठच्याशा परीक्षेत पास झालो आहो असे सागितलें

अनतचें डोके बधीर झालें होते. ह्या साऱ्या घटनाचा त्याला अर्थच कळत नव्हता. अनपेक्षितपणे सुदैवाचे आणि दुर्दैवाचे असे फटकारे आपणास का बसावेत हे त्याला समजत नव्हते जीवितातल्या साऱ्या मोठ्या इच्छा-आकाक्षा त्याने सोडून दिल्या होत्या साधे सुखाचें जीवन आपल्याला जगता यावे एवढीच त्याची अपेक्षा होती. आणि गंमत अशी की तेवढेदेखील त्याच्या वाट्याला येत नव्हतें.

का, ते त्याला सांगता येत नव्हते कोणालाच अजून सांगता आले नव्हते जीविताची प्रचंड चक्रे गरगरा वेडीवाकडी फिरत होती. त्यात अनेक चिरडले जात होते, अनेक आनंदात डुंबळले जात होते पण सारेच असहाय होते ज्याच्या जे नशिबात होते ते त्याने सहन करायचें होते तिथे भागीदार कोणी कोणाचा नव्हता

समुद्रात तरंगणारी दुभंगलेल्या जहाजातली माणसें जशी लाटेच्या हेलकाव्याबरोबर जवळ येतात आणि दूर जातात, तशीच अवस्था ह्या जीवितगतीत होत होती

तसाच तो चिखल तुडवीत, पावसाने भिजत, घामाने निथळत चालला होता माणसाची रीघ होती, वाहनाचा गोंधळ होता कर्कश आवाजाचा कलबलाट होता

धापा टाकीत तो जिना चढला. बावरीघुबरी झालेलीं त्याची भावंडे त्याला चिकटली किती भेदरले होते त्याचे चेहरे ! त्याला वाटले त्याना हृदयाशी कवटाळावे आणि गुदमरून रडावे पण मोठ्या निर्धाराने त्याने त्याना दूर सारले

त्याचा डाक्टर मित्र अपराधी चेहरा करून तेथे उभा होता त्याच्या तोंडात भडकावाची असे त्याला वाटले पण त्याने इतकेच विचारलें, "किती वाजता झाले हे ?"

तो म्हणाला, "चार वाजता"

आ–तेव्हा तर तो ताराबरोबर हॉटेलात बसला होता. किती सुखात होता तो तेव्हा ! आणि नेमके तेव्हाच ..आणि तारा भेटली नसती तर ? तो घरी आला असता–बहिणीबरोबर सिनेमाला गेला असता ..

त्याला काहीच कळेना तो आपल्या बहिणीजवळ गेला, आणि त्याने तिचा हात पकडला

साराच कारभार आटोपला होता

मुकाट्याने तो उठला आणि खिडकीतून बाहेर पाहात उभा राहिला. त्याचीं भावंडे त्याला बिलगलीं, आणि त्याने त्याना पोटाशी धरलें.

त्याला मुळींच रडूं आलें नाही. काहीच वाटलें नाही

...पाऊस थांबला होता. कोणीसा मुलगा उसाचा रस पीत होता. एक घाणेरडी घूस रस्त्याच्या अगदी मध्यावरून लंगडत चालली होती कोळसेवाल्याच्या पायाखाली ती सापडली नाही. मोटारीच्या चाकाखाली चिरडली नाही. कावळ्याच्या नजरेस पडली नाही. खुशाल पलीकडच्या बाजूच्या बिळांत शिरली.

आणि रस्त्यात एक बाई लफ्फेबाज पातळ नेसून चालली होती. तिच्या हातात बऱ्याच पुड्या होत्या. त्यातली एक खाली पडली ते तिच्या ध्यानांत आलें नाही. आणि गंमत अशी की दुसऱ्या कोणीहि ते तिला सांगितलें नाही.

अनंताला आश्चर्य वाटलें. हे सारे लोक मूर्ख होते की काय? त्याला वाटलें की मोठ्याने ओरडून त्या बाईला ती पुडी दाखवावी

पण तो ओरडला नाही. मात्र आतापर्यंत अडलेले अश्रुबिंदू त्याच्या डोळ्यांतून टपटपा ओघळूं लागले.

इतक्यात पोस्टमनने त्याचें नाव पुकारलें. त्याला ते ऐकूं आलें. पण त्याने काहीच हालचाल केली नाही.

किती विलक्षण थकवा आला होता त्याला! ह्या वेळीदेखील पाच मिनिटें त्याला शांतता मिळूं शकत नव्हती काय?

छे! जगाच्या व्यवहाराचा रेखीव मार्ग कसा बदलूं शकला असता? आणि त्यात कोणाचा दोष होता?

जड पावलानी तो दाराशीं गेला. आणि त्याने पाकिट घेतलें.

...आश्चर्याने तो दिङ्मूढ झाला त्याने जें क्रॉसवर्ड् पझल सहज गमतीने सोडवून पाठवलें होतें त्याबद्दल त्याला दहा हजार रुपयाचें बक्षीस मिळालें होतें.

...डोळे ताणून-ताणून त्याने पाहिलें पण अंधारावाचून त्याला कांहीच दिसेना.

## हृदय

आमच्या मूर्ख पूर्वजाची संस्कृति अंधश्रद्धेची होती, शेतकऱ्यांची होती, गाईची पूजा करणारी होती त्याच्या शहाण्या वंशजाची संस्कृति अश्रद्धेची आहे, यंत्राची आहे, पैशाची पूजा करणारी आहे.

ही यांत्रिक संस्कृति म्हणजे माणसाची अजब करामत आहे.

निरनिराळे प्रचंड उद्योगधंदे हे ह्या संस्कृतीचे अवयव ! लोहमार्ग व जलमार्ग ह्या तिच्या रक्तवाहिन्या ! टेलिफोन व तारायंत्रें म्हणजे तिचे मज्जातंतू ! व्यापार हा तिच्यातला रक्तप्रवाह ! व ह्या संस्कृतीच्या शरीरांतील रक्तगोलकाच्या वाहतुकीची हमाली करणाऱ्या तांबड्या पेशींची भूमिका माणसाच्या वाट्याला यावी हें किती योग्य आहे बरें !

आणि हृदय ?

आहे तर. ह्या संस्कृतीलादेखील हृदय आहे.

चकचकीत काउंटर्, ऐटबाज गणवेष केलेले शिपाई, लठ्ठ लेजरांच्या-मागे कैद्यासारखी बसलेली कारकुनाची रांग, टाईपरायटरची टिक्‌टिक् आणि चिमुकल्या सुंदर दरवाजाच्यापलीकडे असलेल्या मॅनेजरच्या खोलींतील टेलिफोनचा घणघणाट ह्या गोष्टींच्या समुच्चयामुळे ओळखूं येणाऱ्या बँका तुम्हीं पाहिल्या असतील ह्या बँका म्हणजेच ह्या संस्कृतीचें हृदय !

किती सुंदर, मजबूत आणि निरलसपणें काम करणारें हृदय हें !

ह्या हृदयात सर्व ठिकाणचा पैसा गोळा होतो, आणि ह्या अर्थ-व्यवस्थेच्या ज्या भागात त्याची सर्वांत अधिक जरुरी असते तेथे रवाना होतो.

निदान ह्या संस्कृतीचे पोवाडे गाणारे अर्थशास्त्रज्ञ तरी अशी ग्वाही देत असतात.

अशा एका बँकेची ही गोष्ट आहे. ही बँक खूप मोठी, भरभराटलेली

आणि प्रतिष्ठित होती. लाखो रुपयांच्या उलाढाली तेथे अव्याहत चाललेल्या असायच्या, काऊंटरजवळ माणसांची ही थाप लागलेली असायची, मॅनेजरच्या टेबलावरील चार टेलिफोन सारखे घणघणत असायचे, कारकुनांना दिवसाला दोन शिसे शाई लागायची, आणि दररोज दोन रिम कागद खर्च व्हायचे

तिथल्या कामाच्या रगाड्यामुळे एका कारकुनाचे डोळे गेले होते, दुसऱ्याला वेड लागले होतें, आणि तीन टायपिस्ट मुली क्षयरोग लागून मेल्या होत्या

बॅंकेच्या भरभराटीचा ह्याहून मोठा पुरावा तो कोणता ?

अर्थात् ह्या बॅंकेचे मॅनेजर म्हणजे मोठे हुशार गृहस्थ होते पोस्टातून जितकी पत्रें जात नसतील, तितक्या लहानसहान गोष्टी त्याच्या स्मरणात असत. आपल्या डाकेच्या ढिगाऱ्याला उत्तरे देण्याचे काम ते अवघ्या एक तासात आटपत. कामकाजाच्या कागदावर दोन-तीन तासांत सह्या होत आणि भेटायला आलेल्या माणसाला तर ते इतक्या लवकर वाटेला लावीत की त्याच्या खोलीच्या झुलत्या दरवाजाला विश्रांति कशी ती माहितच नव्हती

आणि इतकें असूनहि मनुष्य फार टापटिपीने राहायचा आणि हसतमुख असायचा त्याच्या कपड्याइतकेंच त्याचें हास्य परिटघडीचें होतें त्याच्या चकचकीत बुटावर जसा धुळीचा कणहि नसे, तसा वर्तनात वावगेपणाचा लवलेशहि नसे फार मोठ्या रकमाबद्दल बोलायचें म्हणून की काय ते फार हलक्या आवाजात बोलत आणि चांदीच्या नाण्याचा मधुर छनछनाटासारखा त्याचा आवाज गोड आणि गुंगवून सोडणारा होता

त्याच्या बोलण्याचे परिणामदेखील तसेच महत्त्वाचे असत टेलिफोनवरून त्याचा हा आवाज ऐकला की दोन-चार मोठमोठे शेटजी बाजारात झपाट्याने उलाढाली करीत बॅंकेतर्फेहि व्यवहार होई मग एखाद्या शेअरचा भाव एकदम कडाडे लोक भराभरा ते विकत घेऊ लागत. पण एवढ्या अवधीत बॅंक आणि शेटजी आपले शेअर विकून मोकळे-देखील झालेले असत.

काय म्हणता ? सट्टा ?

भलतेंच ! बँकांसारख्या प्रतिष्ठित संस्था कधी सट्टा का खेळतात ? .

शिवाय मॅनेजरसाहेब मोठे दयाळू होते त्यांच्यापुढे हात पसरला की भिकाऱ्यांना हटकून लाभ व्हायचा–पैसा नव्हे ह, आणेली ! एकदा एक कारकून आजारी पडला तेव्हा त्यांनी त्याला एक महिना जादा बिनपगारी रजा दिली होती. आणि गरीब लोकांची सोय व्हावी म्हणून त्यांनी आपल्या बँकेत होम सेव्हिंग अकौंटची पद्धत सुरू केली होती

ह्या होम सेव्हिंग् अकौंटमध्ये अनेक गरीब कारकून, शाळामास्तर, आणि दुकानातले नोकर आपले पैसे ठेवीत दर महिन्याला फार तर दोन, तीन किंवा फार तर पांच रुपयांची वाट प्रत्येकाच्या शिलकींत होत असे. त्यांच्या पासबुकांत कारकुनाने तितकी रक्कम वाढवली की त्या वाढलेल्या रकमेच्या आकड्याकडे पुन्हा-पुन्हा पाहत ते बँकतून बाहेर पडत आणि बँकेच्या पठाणाने जर त्यांना कदाचित् चुकून सलाम केलाच तर हीं बावळट माणसे इतकी गागरून जात की बोलता सोय नाही.

ह्या अनेक बावळट लोकांपैकी एकजण आज बँकेंत आला होता. त्याच्या अकाउंटचा नंबर होता चोविसशें अडतीस त्याचें नावगांव–पण मला वाटते की आजकाल माणसाच्या नावगावापेक्षा त्याच्या अकाउंटची माहितीच त्याचें मोल अजमावायला अधिक उपयुक्त ठरेल . . .

हा माणूस कुठच्याशा औषधाच्या दुकानात विक्रेता होता. त्याचें शरीर फिकुटलेलें होतें आपल्या शरीराला कोणती जीवनसत्त्वे अवश्य आहेत हें बहुधा त्याला माहीत नसावें.

त्याचे कपडे जरी स्वच्छ व व्यवस्थित होते तरी कोटाची कॉलर् उसवलेली होती, सदऱ्याला छातीवर एक ठिगळ मारलेलें होतें आणि धोतर जागोजाग शिवलेले होतें.

आणि त्याचा चेहेरा ! वर्णन करण्यासारखें त्यात कांही नव्हतेंच. त्याच्याजवळ बुद्धिमत्ता दर्शविणारें उंच कपाळ नव्हतें, हृदयाचा ठाव घेणारे भावपूर्ण डोळे नव्हते, मिस्किल हास्य नव्हतें, ऐटबाज हनुवटी नव्हती, फार

काय कुरळे केसदेखील नव्हते, कुठचाहि आधुनिक मराठी ललित लेखक असल्या माणसाचें वर्णन करायला क्षणभरहि धावणार नाही.

पण गंमत अशी की [illegible] एक माणस त्या माणसासारखेंच असतात आणि सर्वसामान्य माणसाचे सारे गुणदोष त्याच्या ठिकाणी होते म्हणजे तो बराचसा मूर्ख आणि दुबळा होता, थोडासा दुष्ट आणि लुच्चा होता, व प्रेमळहि होता आणि मुख्य म्हणजे तो दरिद्री होता.

उंदराच्या बिळाप्रमाणे दिसणाऱ्या एका चाळीतल्या खोलीत तो राहायचा भातभाकरीवर आणि पानशेर दुधाच्या रतीबावर तो चार माणसाचा निर्वाह चालवायचा, मोडकळीला आलेली एकुलती एक खुर्ची पाहुण्याच्या पुढे करायचा आणि जवाहरलाल नेहरूंची भाषणें भक्तिभावानें ऐकायचा.

दारिद्र्यानें त्याला असे पछाडलें होतें तरी त्या कोडग्या माणसाला जगायची हौस होती आपली परिस्थिति सुधारेल अशी आधळी आशा होती. कधी-कधी हौसमौज करावी असें त्याला वाटायचें तो खुशाल हसायचा आणि बायकोवर प्रेमदेखील करायचा !

खरोखरच हें एक मोठें नवल होतें. कारण त्याच्या बायकोजवळ सौंदर्य नव्हतें, समंजसपणा नव्हता अगर स्वभावाचे मार्दवदेखील नव्हते. ती मूर्ख आणि कजाग होती आणि तरी ती त्याला आवडायची

कदाचित् त्याला आवडणारी अळवाची भाजी तिला चांगली करता येत होती म्हणून ती त्याला आवडत असेल, कदाचित् सिनेमा-नटीप्रमाणे केसाचीं उलटीं वळणें घेण्याच्या तिच्या प्रयत्नामुळे असेल, किंवा बिछान्यात तिच्यापासून मिळणारें सुख हेच त्याच्या आयुष्यातलें मोठें सुख असल्यामुळे ती आवडत असेल. किंवा प्रेम करणें हा मनुष्यस्वभाव आहे म्हणूनच निव्वळ तो तिच्यावर फिदा असेल

आणि ह्या अडाणी प्रेमामुळेच तो मूर्ख माणूस ह्या बॅंकेची पायरी चढत होता.

नेहमीचीच रडकथा होती ती पाण्याच्या बालद्याची मतत वाहतूक

करून म्हणा, अगर वाईटसाईट अन्न खाल्ल्यामुळे म्हणा किंवा एकापाठोपाठ एक अशा चालू असलेल्या बाळंतपणामुळे म्हणा, त्याच्या बायकोच्या प्रकृतीत बिघाड झाला होता पोटदुखीची व्यथा तिला जडली होती अर्थातच पुष्कळ दिवस तिकडे दुर्लक्ष झाले होते पण त्यामुळे रोग बळावला त्याची बायको फिक्कट दिसू लागली, अन्न खाईनाशी झाली आणि मुख्य म्हणजे तिच्याने काम होईनासे झाले तेव्हा अगारेजुपारे झाले, घरगुती औषधपाणी झालें, व वैद्यापर्यंत मजल गेली पण काही सुधारणा होईना शेवटी रोग्याला तपासल्यावर ताबडतोब साबणाने हात धुणारा डॉक्टर बोलवावा लागला त्याने फटकन् सांगितले की पोटाचे ऑपरेशन् करावे लागेल आणि त्याला खर्च येईल पाचशे रुपये पाचशे रुपये अर्थातच त्याच्याजवळ नव्हते. इतके दिवसांची त्याची बचत अवघी दोनशे रुपये होती

गरीब लोकांच्या बाबतींत अशी परिस्थिति निर्माण झाली म्हणजे पुढचा मार्ग सोपा असतो काहीतरी करायचे म्हणून वैद्याचे औषध चालू राहते, आणि मग यथावकाश रोगी मरतो किंवा कधी कधी जगतोहि! इतकी हीं गरीब माणसें चिवट आणि जिवट असतात

पण इथेच ह्या माणसाचें अडाणी प्रेम आडवे आले तिला मरू द्यायला तो तयार नव्हता आणि तिला जगविण्याकरिता पैसे गोळा करण्याचा निष्फळ खटाटोप तो करू लागला त्याने आपल्या दुकानाच्या मालकाकडे पैसे मागितले, मित्राच्याकडे मागितले आणि मारवाड्याकडेदेखील! पण कोकणातल्या कुठच्याशा गावात असलेल्या त्याच्या टिचभर शेताच्या तारणावर त्याला पैसे द्यायला कोणीहि कबूल होईना.

पण एक माणूस त्याला कर्ज द्यायला तयार होता तो म्हणजे त्याच्या गावचा सावकार मात्र व्याजाचा दर होता वीस टक्के, आणि मुदत होती पाच वर्षांची.

ह्याचा सरळ अर्थ असा होता की पाच वर्षांनंतर त्याचें शेत जाणार होते. आणि शिवाय वर थोडेसें देणे शिल्लक राहिले असतें बायकोकरिता इतका त्याग करायला तो सहज तयार झाला असता.

पण इथेहि एक अडचण होती कारण त्या अडाणी माणसाचें बायकोवर जसें प्रेम होते, तसें एक सुखस्वप्नहि होते.

सुखस्वप्न तसें काव्यात्मक नव्हते म्हणा चंद्रकिरणाच्या हिंदोळ्यावर बसून त्याला झोके घ्यायचे नव्हते, 'या इथे तरुतळी सुरई एक सुरेची . ' अशा मदिर कल्पनात तो गुंगला नव्हता, अगर ज्ञान, सामर्थ्य व सपत्ति ही उग्र तपश्चर्येच्या जोरावर त्याला मिळवायची नव्हती

त्याची इच्छा फारच सामान्य होती ससारातल्या जबाबदाऱ्या पार पडल्यावर त्याला आपल्या गावी शेतावर जाऊन राहायचे होते. तेथे तो पन्नास कलमें लावणार होता पहाटे उठून रहाटाला बैल जोडून त्याचे शिपणें करणार होता, आणि पाच वर्षांनतर त्याच्यावरचे निम्मे आंबे विकून निम्मे खाणार होता शेंगटाच्या शेंगांची चवदार भाजी त्याला वर्षातून सहा महिने मिळणार होती आणि जत्रेच्या दिवशीं आपली तल्लख बैलाची जोडी बाहेर काढून तो शर्यती जिंकणार होता

इतकीं वर्षे शहरात राहिल्यावर त्याला खरोखरीच ह्या गोष्टीत मजा वाटली असती की नाही कोण जाणे ! पण त्याच्या दृष्टीने हें सुखस्वप्न म्हणजे जगातलें सर्वात मोठे सत्य होते आणि म्हणून त्याला त्याचें शेत हवे होते.

साम्राज्य की प्रेयसी असा प्रश्न नुकताच जेव्हा एका राजापुढे पडला होता, तेव्हा साऱ्या जगाने त्याचें कौतुक केलें होतें ह्या अडाणी माणसाला जगाचें कौतुक नको होतें, फक्त तीनशे रुपये हवे होते ते त्याला द्यायला कोणी तयार नव्हतें.

शेवटीं त्या मूर्ख माणसाच्या मनात एक धाडसी विचार आला. आपल्या बँकेकडून पैसे मागायचें त्याने ठरविलें. लाखो रुपयाचा व्यवहार करणाऱ्या त्या अगडबंब संस्थेला त्याला तीनशें रुपये देणें का अशक्य होते? त्याच्याकडून अव्वाच्या सव्वा व्याज घेण्याचा दुष्टपणा ती संस्था कसा बरें करील ? शिवाय शेताचें तारण होतें व इमानाने तो पैसे फेडणार होता.

आणि म्हणून तो तेथे आला होता. त्याचे म्हणणे एकच होतें. त्याला मॅनेजरसाहेबाना भेटायचें होते. मॅनेजरनी त्याची थोडी माहिती

ऐकली, आणि कारकुनाला त्याचे काय काम असेल तें करून टाकण्यास सांगितलें, पण अकाउंट नंबर चोविसशें अडतीस दुसऱ्या कोणाला आपलें काम सांगायला तयार नव्हता

शेवटी एकदाचा त्याने मॅनेजरसाहेबाच्या खोलीचा झुलता दरवाजा ओलांडला आणि मॅनेजरसाहेबानी आपल्या परिटघडी हास्याने आणि नाण्याच्या छनछनाटासारख्या आवाजाने त्याचे स्वागत केलें.

त्या स्वागताने त्या भोळया माणसाचें हृदय फुलले आणि भीत-भीत, चाचरत व टाचणीने मॅनेजरसाहेबाच्या टेबलावर रेघोट्या ओढीत त्याने आपली हकीगत सांगितली पण त्याच्या हकिगतीपेक्षा हातातल्या टाचणीने तो करीत असलेल्या चाळ्याकडेच त्याचें अधिक लक्ष होतें.

त्याचें बोलणें संपल्यावर त्यांनी हसतमुखाने सांगितलें की, बँक इतक्या लहान रकमाचा व्यवहार करीत नाही आणि शेतजमीन तारणावर तर बँका कधीच पैसे देत नाहीत

अकाउंट नंबर चोविसशे अडतीसने परत गयावया केली.

मॅनेजरसाहेबानी परत हसून सांगितलें की, त्याच्या परिस्थितीविषयीं त्याना फार सहानुभूति वाटत होती. पण ते काय करूं शकणार होते ? बॅंकेचे नियम होते ना ! ह्या नियमापुढे कोणाचें काही चालण्यासारखें नव्हतें.. बॅंक त्याच्या घरची थोडीच होती ?

आणि बॅंकेच्या नियमानी आपण पार जखडले गेलों आहोंत अशी त्यानी चर्चा केली.

अकाउंट नंबर चोविसशें अडतीसच्या डोक्यात त्यांचे शब्द घोळत होते—बॅंक काही माझ्या घरची नाही आणि तो एकदम म्हणाला, "बॅंकेचें एक राहूं देत, साहेब. पण तुम्हीं स्वत च द्या की मला तीनशे रुपये. फेडीन मी इमानानं"

असला प्रश्न मॅनेजरसाहेबानी अपेक्षिला नव्हता. त्याच्या चर्येवरचें परिटघडी हास्य एकदम मावळले, आवाजातलें मार्दव लोपलें आणि डोळ्यावरचा चष्मा पुन्हा-पुन्हा काढण्याचा आणि लावण्याचा चाळा ते करूं

लागले. ते म्हणाले, "हें पहा, हे ऑफिस आहे असले खाजगी प्रश्न इथे विचारणें योग्य नाहीं आणि मी देण्याघेण्याचे व्यवहार करीत नसतो जा तुम्हीं आता" आणि दुसऱ्या कामात डोकें खुपराण्याचा बहाणा त्यानी केला.

बॅंक अकाउंट नबर चोविसशे अडतीस हताश झाला आणि उठण्याकरिता आपल्या पायातली शक्ती एकवटू लागला इतक्यात चुकून त्याचें लक्ष मॅनेजरसाहेबाच्या मनगटावरील सोनेरी घड्याळाकडे गेलें.

मानवी मन हे मोठे विचित्र आहे त्या घड्याळाकडे पाहून त्या माणसाला एकदम उमाळा आला आणि एक हुदका त्याच्या कठातून निसटला

आपल्या बायकोने जगावे म्हणून बॅकेत तसा त्याला रडताना पाहून मॅनेजरसाहेबाना कसेसें वाटू लागलें हे सारे असस्कृतपणाचे होते, अडाणीपणाचें होते नियमाचा भंग होत होता बॅकेत रडायचें म्हणजे काय ?

छे, छे, काहीतरी करून ह्या माणसाला बाहेर काढणे अवश्य होते आणि पैशाचा व्यवहार जाणणाऱ्या त्या माणसाने चटकन् खिशातून एक पाचाची नोट काढली आणि त्याच्यापुढे ठेवीत म्हटलें, "हे घ्या पाच रुपये. एवढीच मदत मी तुम्हाला करू शकतो आणि आपण आता कृपा करून जा."

ती पाच रुपयाची नोट पाहून त्या दरिद्री माणसाचे डोके उसळलें त्याला भिकाऱ्याप्रमाणे वागवणाऱ्या त्या माणसाचे नरडे दाबावे, त्याचें सोनेरी घड्याळ फोडून तोडून टाकावे असें त्याला वाटले आणि त्याच वेळेला त्याच्या डोक्यात असा एक दरिद्री विचार दबकत-दबकत आला की मोफतचे हे पाच रुपये मिळत आहेत ते घेऊन टाकावे झालें

आणि त्याच वेळेला तो त्या नोटीकडे दृष्टीदेखील न टाकता वेगाने निघून गेला.

मॅनेजरसाहेबानी एक सुस्कारा सोडला. सोनेरी चष्मा नीट नाकावर बसवला, पाच रुपयाची नोट परत खिशात कोंबली, आणि परिटघडीचे हास्य परत तोंडावर आणलें.

इतक्यात टेलिफोनची घंटी वाजली मॅनेजरसाहेबानी टेलिफोन कानाला लावला. अकाऊंट नबर सातशे बारा बोलत होता

हा मनुष्य त्या पहिल्या माणसासारखाच होता म्हणजे तो बराचसा मूर्ख आणि दुबळा होता थोडासा दुष्ट आणि लुच्चा होता आणि काहीसा प्रेमळहि होता. फरक इतकाच की त्याच्या कपाळावरचा दारिद्र्याचा शिक्का चुकला होता

हा फरक अर्थात् फार महत्त्वाचा होता ह्या फरकामुळे दरिद्री माणसाप्रमाणे पोटाकरिता काबाडकष्ट करण्यात बराचसा वेळ घालविणे त्याला अशक्य झालें होतें आणि ह्या वेळाचें काय करावे ह्याचा त्याच्या रिकाम्या डोक्याला प्रश्न पडला होता

ह्या प्रश्नाचे सर्वात सोपे आणि अर्थातूच चुकीचें उत्तर त्याने शोधून काढलें होते उत्तान अनुभूतीच्या शिखरावर तो सतत बसून राहणार होता घोड्याच्या शर्यती, दारूच्या बाटल्या, शेअर बाजारातील कडाडणारे आणि कोसळणारे भाव व स्त्रिया! त्याची गरम, बेफाम करणारीं शरीरें, विकृत प्रणयचेष्टा, बीभत्स संभाषणे, किळसवाणा संभोग, आणि उन्माद ओसरल्यावर होणारी हलकट भांडणे! ह्या अनुभूतीच्या उन्मत्त नशेत तर्रर होऊन तो जगत होता त्या चिखलात त्याची माणुसकी बरबटली होती संपत्ति धुळीला मिळत होती.

सध्या तो एका पस्तीस वर्षाच्या सिनेमातारकेवर फिदा झाला होता. तसें म्हटलें तर फिदा होण्यासारखें तिच्यात काहीच नव्हतें आधीच बेडौल असलेलें तिचें शरीर, अनेक पुरुषानी हाताळल्यामुळे निबर झालें होतें. मन चिघळलेल्या जखमेसारखे झालें होतें आणि म्हणूनच मला वाटतें की घोंगावणाऱ्या माशाप्रमाणे पुरुष तिच्याभोवती गोळा होत होते.

तो असाच तिच्याकरिता वेडा झाला होता. तिचें अर्धनग्न नृत्य त्याला पाहायचें होतें, झिरझिरीत वस्त्रातून डोकावणाऱ्या स्तनाग्राना दंश करायचा होता आणि तिच्या तोंडात दारूची चूळ फेकायची होती

त्याला अधिक आतुर करण्याकरिता ती त्याला दूर ठेवीत होती. आणि तो जेव्हा फारच उतावीळ झाला, तेव्हा तिने त्याच्याकडे दहा हजार रुपयाची मागणी केली. तिला एक कोरी करकरीत मोटार हवी होती. ही

मागणी करतांना तिने त्याच्या गळ्याभोवती हात टाकले होते ओठांना दंश केला होता.

बेभान होऊन तो म्हणाला, "दहा हजार रुपये म्हणजे काय मोठीशी गोष्ट आहे? मीं त्याच्यावर लाथ मारतो, थुकतो."

आणि त्याने ताबडतोब बँकेच्या मॅनेजरला फोन केला त्याचे वीस हजाराचे शेअर तो तारण म्हणून बँकेला देणार होता आणि त्याला दहा हजार रुपये पाहिजे होते थोड्या दिवसाकरिता

...थोड्या दिवसानी त्या शेअर्सचा भाव वाढणार होता वीस हजाराचे तीस हजार होणार होते आणि शेअर विकून तो दहा हजार रुपये फेडणार होता. सारें काम फुकटात होणार होतें पैशाच्या जगाची ही सोनेरी किमया होती. निदान त्याला तसें वाटत होतें.

मॅनेजरसाहेबानी परिटघडीचें हास्य केलें आणि आपल्या रुपेरी आवाजांत त्यांनी रुकार दिला.

ती सिनेमानटी कोऱ्या करकरीत ऐटबाज गाडीतून हिंडूं लागली
जेथे जरूर होती तेथे पैसा गेला होता
हृदयाने आपलें काम बजावलें होतें.

# सलामी

सडकेच्या कडेला असलेलें तें झोपडें गावापासून अगदी अलग होतें. अगदी छोटे होते ते आणि काहीसें विस्कळीत दिसायचें जणु मोटारीतून जाणाऱ्या एखाद्या माणसाने भिरकावलेली पिवळ्या कागदाची पुरचुंडीच रस्त्याच्या कडेला पडली होती !

आणि त्याच्या छोटेपणाला आणि गरिबीला अगदी न शोभणारी अशी आनदाची झाक त्या झोपड्यावर दिसायची मग ती समोर सारवलेल्या छोट्याशा अगणाची करामत होती, की सूर्यकिरणाची जादू होती कोण जाणे !

कदाचित् त्यात राहणाऱ्या साध्या सुखी माणसाच्या जीवितातील तृप्ति त्या झोपड्यात व्यक्त होत असावी निदान तेथे राहणाऱ्या छोट्या भिकूच्या चिमुकल्या जीवनात तरी ती तृप्ति ओतप्रोत भरून राहिली होती

सारवलेल्या खडबडीत अगणात तो मजेंत उताणा पडला होता. त्याच्या लाबोडक्या डोक्याला एक बारीकसा खडा टोचत होता. शेजारच्या वडाच्या झाडाचें एक अर्धवट सुकलेलें पिवळें पान हेलकावे खात-खात नेमकें त्याच्या फुगीर पोटावर येऊन विसावलें होतें त्याच्या एका गालाला सारवणाचा पिवळा भुगा चिकटला होता आणि सूर्याची पहिलीं उन्हें त्याचें काळेंसावळें लुसलुशीत शरीर चागलें खरपूस शेकून काढीत होतीं. त्याची बय बाजरीची कुरकुरीत भाकरी चुलींत टाकून शेकायची ना, तसें.

आणि शेकल्या जाणाऱ्या त्या भाकरीप्रमाणेच तो आनंदाने अगदी तट्ट फुगला होता.

उगीचच तो जोरजोराने मुंडी हलवीत होता. पाय घांगसत होता. एका हाताने आपलें डोचकें ओरबाडीत होता आणि दुसऱ्या हातातला भाकरीचा तुकडा मोठ्या रसिकतेने कुरतडत होता.

एकंदरीत त्याला फार मौज वाटत होती जीविताचें जें विचित्र खेळणें परमेश्वराने त्याच्या हातात दिले होते ते त्याला एकदम पसत पडलें होते हवेत उंच तरगणाऱ्या घारी, भुर्रकन् इकडेतिकडे जाणाऱ्या चिमण्या, अस्थिर फुलपाखरें, आळशी झाडे, म्हातारे डोगर आणि अगणातून सतत सरकत राहणारी मुंग्याची राग ह्या साऱ्या गोष्टीविषयी त्याला अकारण प्रेम आणि औत्सुक्य वाटायचें.

त्या मुंग्याच्या रागेकडे तो तासन्तास पाहत राहायचा, आणि एखादी मुगी जर रागेतून बाहेर पडली तर त्याला तिच्याविषयीं फार काळजी वाटू लागायची. घारीप्रमाणे उडण्याकरिता तो गडग्यावर चढून जोरजोराने हात हलवायचा, आणि मग आपल्याला उडता का येत नाही ह्याचा गंभीरपणे विचार करीत बसायचा.

तितक्यात एखादें उनाड फुलपाखरू त्याचे लक्ष वेधून ध्यायचे आणि प्रत्येक गवताच्या काडीजवळ ते का जातें ह्याचे संशोधन करायची जबाबदारी त्याच्यावर टाकून निघून जायचें.

मग गंभीर वृत्तीची मनी माजरी त्याच्यासमोर येऊन बसायची आणि म्हणायची, "म्यॉव्"–लगेच तिच्यासारख्या आपल्याला मिशा आहेत की नाही हें पाहण्याकरिता तो गालाला हात लावायचा आणि मग त्याला आठवायचे की, आपल्या 'बा'ला अशा मिशा आहेत

कधीकधी त्याच्याभोवती पसरलेल्या साऱ्या वस्तूंच्या आकृती अस्पष्ट होत आणि फक्त निळ्या, हिरव्या, करड्या, पिवळया आणि लाल रंगाचे पट्टे तेवढे त्याच्या नजरेसमोर नाचत राहत

त्याच्या जीवितात साहसें, संकटें आणि मूलभूत प्रश्न नव्हते असें कसें म्हणता येईल ? कारण कधीकधी शेवंती गाईचें छोटें वासरू मोकळें सुटायचें व वाकड्यातिकड्या उड्या मारीत त्याच्याकडे धावत यायचें आणि मग त्याची अशी तिरपीट उडायची म्हणताय्! कधीकधी तर कावळे धिटाईने त्याच्या हातांतली भाकरीच लाबवायचे, व भिकूला मोठ्या संकटात लोटायचे. संध्याकाळच्या वेळीं झोपडीच्या कोपऱ्यात बसून चिलमीने

अंधाराला डागणारा भिकूचा 'बा' म्हणजे त्याच्या जीवनातील दुष्ट राक्षस होता आणि नुकतीच रागूं लागलेली पारू तर त्याच्या विटीचा कबजा घेऊन त्याच्या मालकी हक्काची पायमल्ली करायची

पण ह्या साऱ्या संकटातून आणि पेचप्रसंगातून मुक्त होण्याची गुरुकिल्ली त्याला माहीत होती. ती म्हणजे बयच्या नावाने मोठ्याने आक्रोश करणें तसें केले म्हणजे व्रात्य वासरू गिरफदार केले जाई, भाकरीचा प्रश्न तातडीने सोडवण्यात येई, धगधगणाऱ्या चिलमीचा धाक कमी होई, आणि जबरदस्तीने बळकावल्या गेलेल्या मालमत्तेचा परत ताबा मिळत असे

बयच्या एकतंत्री राजसत्तेखाली नांदणाऱ्या त्या चिमुकल्या झोपडीतील प्रजेला शांतता, सुरक्षितता आणि न्याय ही नेहमी झटपट मिळत, आणि तिच्या हातून मिळणाऱ्या शिक्षेची मजल दोन-चार झणझणीत शिव्या नाहीतर सणसणीत थपडा ह्याच्यापलीकडे जात नसे

दगेधोपे, आर्थिक पिळवणूक आणि राजकीय जुलूम हे अधिक सुधारलेल्या राज्यव्यवस्थात आढळून येणारे गंभीर प्रश्न, त्या राज्याच्या आसपासदेखील फिरकत नसत.

आणि म्हणून भिकूचें जीवित फार उबदार आणि चवदार होतें. अगदी त्याच्या हातातल्या भाकरीच्या तुकड्यासारखें ! मिठाच्या दाण्यासारखें ! चिंचेच्या गुळमट बोटकासारखे !

आणि ह्या तृप्तीतूनच त्याच्या जीवितातली नवी अतृप्ति निर्माण होत होती कधी कधी एखाद्या पक्ष्याच्या पिलाने आपल्या मऊ, उबदार घरट्यातून हळूच बाहेर डोकावून पाहावे, त्याप्रमाणे त्या चिमुकल्या जगात रमलेलें त्याचें मन बाह्य जगाकडे कुतूहलाने आणि हावरेपणाने डोकावून पाही व आपल्या मर्यादित व निवाऱ्याच्या जीवनात जे सुख त्याला मिळत होतें तेंच बाहेरच्या जगात अधिक मोठ्या प्रमाणात मिळेल अशी त्याची समजूत होती. जगातील सारीं मोठीं माणसें म्हणजे त्याच्या दृष्टीने बयच्या वेगवेगळ्या आवृत्त्या होत्या आणि रस्त्यातून जाणारे मोठ्या शिंगाचे बैल म्हणजे त्याच्या दृष्टीने बाह्य जगातलीं सर्वांत मोठीं संकटें होतीं.

त्याच्या घरासमोरून दूरवर वळणें घेत गेलेला तो रस्ता म्हणजे त्याचें जीवित बाह्य जीविताशीं सांधणारा दुवा होता.

त्या रस्त्याने अनेक माणसें जात-येत असत, काही चालत, काही गाड्यातून आणि काही तर मोटारींतून भुर्रदिशीं! आणि हीं सारीं माणसें कुठे जातात हें त्याला माहीत नव्हतें असें वाटलें की काय तुम्हाला? वा! तें तर त्याला अगदी पक्कें माहीत होतें नव्या कपड्याच्या गाठोड्यासारख्या असणाऱ्या एका दिवशी तो ह्याच रस्त्याने जत्रेला गेला नव्हता काय? आणि तेथे गरगरा फिरणाऱ्या पाळण्यातून आभाळात भिरकावला जात असता आपल्या खाऊच्या पुडीचें त्याने किती शिताफीने रक्षण केलें होतें!

रस्त्याने जाणारीं सारीं माणसेंदेखील अशीच पाळण्यात बसून पोटाला गुदगुल्या करून घ्यायला जात असावींत त्यालाहि परत त्या अद्‌भुत जत्रेला जायचें होतें आणि दररोज त्याची बय जेव्हा शेंगा आणि पेरू टोपलींत घेऊन त्या रस्त्याने जायची, तेव्हा तर त्याचें मन, लुचायला सोडलेल्या वासरासारखें, आतुर होई. पण—

आतादेखील त्याची बय डोक्यावर टोपली घेऊन निघाली होती. आणि तो तिच्याकडे खट्टूपणाने पाहत होता इतक्यात त्याच्याकडे नजर-देखील न टाकता बय म्हणाली, "भिक्या, चल माझ्यासंग."

ते शब्द ऐकताच भिकूच्या पोटात भल्या थोरल्या बेडकाने एक मोठ्ठी उडी मारली व त्याच्या डोक्यात खूपशा मुंग्या धावूं लागल्या. इतकी महत्त्वाची बातमी बय इतकी सहजगत्या सागते तरी कशी ह्याचा त्याला अचंबा वाटला आणि तिच्याविषयींचा त्याचा आदर दुणावला.

घाईघाईने भिकूने आपला नवा सदरा चढवला. बटणें लावताना त्याचीं नखें खूप दुखलीं आणि मग मुंग्याच्या रांगेसारखा तो तिच्यामागून सावकाश सरळपणें चालूं लागला.

पण तेवढ्यात बय ओरडली, "चल बिगी-बिगी." आणि झपाट्याने चालणाऱ्या बयच्यामागून भिकू धावूं लागला. धावताना त्याचे पाय भरून आले, छातींत श्वास मावेनासा झाला आणि नाक शेंबडाने लडबडलें.

पण ह्यामुळे भिकूचा उत्साह दुणावला मात्र !

शेवटी एकदा गाव लागला आणि मग एकदम एक अनपेक्षित घटना घडली.

भिकूच्या कानावर एकदम एक मोठा ओरडा आला त्याने आश्चर्याने वळून पाहिलें तों गावातल्या मुलाचा एक घोळका त्याच्याकडे पाहून हसत होता, ओरडत होता, हातवारे करीत होता इतक्यात काही मुलें त्याच्याकडे धावली व त्यातल्या एकाने जो दगड भिरकावला तो भिकूच्या कोपऱ्याला टचदिशीं लागला.

भिकू भेदरलेल्या उंदराच्या पिलासारखा बयच्या पायात जाऊन गुरफटला.

प्रसंग फार छोटा होता. पण त्याने भिकूच्या मनात अनेक तरंग उठविले. ती मुलें हातवारे करून आणि हसून जी काही भावना व्यक्त करीत होतीं, तिचा ओबडधोबड आकार त्याने चाचपून पाहिला तीं त्याची हेटाळणी कर करीत होती तो मळका आहे, घाणेरडा आहे, बावळट आहे आणि परका आहे असें त्याना सागायचें होतें. असें सागण्यात त्यांना काहीतरी मोठी मौज वाटत होती ती मौज भिकूने अजून अनुभवली नव्हती. आणि त्याच्या सात्त्विक वृत्तीला ती मानवत नव्हती.

त्यानतर भिकू बयच्यामागून चालत राहिला खरा, पण त्याचा उत्साह आता ओसरत होता. तो भित्र्या नजरेने, सकटाच्या अपेक्षेने आजू-बाजूच्या माणसाकडे पाहत होता सर्व माणसांविषयीं त्याला जो विश्वास आणि मित्रभाव वाटत होता, त्याला त्या मुलानी मारलेल्या दगडाने तडा गेला होता आणि आपण खरोखरच मळके, घाणेरडे, बावळट आणि परके आहोंत असें त्याला वाटू लागलें. त्याच्या जीवनात तुडुंब भरून राहिलेली तृप्ति झिरपून जाऊं लागली.

त्याच्या मनात हे जें सारें होत होतें त्यावर काहीतरी उपाय करावा असें त्याला वाटत होतें आणि म्हणून त्याने कुरकुऱ्या स्वरांत बयकडे तक्रार केली. पण ती तक्रार करीत असतानाच त्याला पोटातून असें वाटत होतें की,

ह्या मनाच्या अस्वस्थतेवर इलाज करणें बयच्या हातात नाही. आपल्याला आवडो अगर न आवडो ती आपण मुकाट्याने सहन केली पाहिजे

बयच्या अमर्याद वाटणाऱ्या सामर्थ्यालादेखील मर्यादा होत्या तर '. .

मोटारीच्या अड्डयावर येऊन बय थाबली आणि झाडाखाली बसली

मोटारीच्या अड्डयावर बऱ्याचशा मोटारी थाबल्या होत्या आणि त्याचे पत्रे उन्हात चकचकत होते. मध्येच एखादी मोटार मोठाले आवाज करीत निघून जाई, आणि तिने उडविलेले धुळीचे लोट हवेत तरगत राहत व उन्हात चमकत माणसाचे पुंजके तेथे वेडेवाकडे पसरले होते त्यात जे पाढरपेशे होते ते अशा भावनेने वागत होते की, त्याचे बोलणे फार महत्त्वाचें होतें त्याचें हसणें फार गमतीचें होते, व त्याचे पोषाख विलक्षण ऐटबाज होते, आणि हॉटेलात जाऊन चहा पिण्याची त्याची पद्धत तर फार नाजुक होती. अगदी त्याच्या बाहुल्यासारख्या दिसणाऱ्या बायकासारखी !

माणसाच्या त्या निराळया जातीकडे भिकू आश्चर्याने आणि आदराने पाहत होता त्याचा नवा सदरा आता त्याच्या अगाला बोचू लागला, आणि त्या माणसाभोवती त्याचें मन अद्भुततेचें वलय निर्माण करू लागले. त्याची बयदेखील त्याच्यापुढे अगदी फिकी व दुर्बल भासू लागली आणि चहाच्या हॉटेलांत वाजणाऱ्या ग्रामोफोनच्या कर्कश ढंगदार सुरावटीने त्याच्या ह्या मानसिक प्रक्रियेला विलक्षण उठावदारपणा आला.

इतक्यात बाहुलीसारखी दिसणारी एक छानदार बाई त्याच्या बयजवळ आली, आणि टोपलीतले पेरू उचलूं लागली खाली वाकल्यामुळे तिच्या पदराचें टोक जमिनीवर लोळलें ते बयने चटकन् उचलून धरले आणि तिच्या केसाचा मंद सुगध जेव्हा भिकूपर्यंत पोहोचला तेव्हा त्याला एकदम अपराध्यासारखें वाटूं लागलें

शेवटीं एकदा ताईसाहेबानी पेरू निवडले आणि बयच्या अगावर एक नाणें टाकीत त्या म्हणाल्या, " आता एवढे कसे नेऊं ग, मी मोटारीत ?"

बय तोंडभर हसून म्हणाली, " त्येच काय, ताईसाहेब, हा पोरगा येईल ना घेऊन "

मग इतका वेळ गोड बोलणारी बय त्याच्यावर खेकसून म्हणाली, "घे ते पेरू सदऱ्याच्या टोकात, आणि जा ताईसाहेबाच्यामागोमाग "

भिकू चुळबुळ करू लागला. त्याचा नवा सदरा एव्हाना त्याला मळका वाटू लागला होता आणि त्यातून पेरू नेऊन तो आणखी मळका करायला तो नाकबूल होता पण तो काही बोलण्यापूर्वीच बयने त्याच्या पाठीत एक चापटी मारली आणि बकोट धरून त्याला उभें केलें व त्याच्या सदऱ्याच्या टोकात पेरू भरले

सदऱ्याचें टोक सावरीत तो निमूटपणें ताईसाहेबाच्यामागोमाग चालू लागला. मध्येच ताईसाहेब दुसऱ्या एका ताईसाहेबाशी बोलत उभ्या राहिल्या तेव्हा तो पाच मिनिटें स्वस्थ उभा राहिला, आणि मग पेरू मोटारीत ठेवून परत आला

त्याच्या मनात राग धुमसत होता पण तो बयवर रागावला नव्हता. आईच्या मनातले सूक्ष्म भावदेखील बालमनाला समजतात, आणि त्याला हें तेव्हाच समजले होतें कीं, बयने जे केलें होतें ते नाइलाजाने, असहायतेने केलें होतें तिला तसे करायला लावणारें दुसरेंच कोणीतरी होतें. म्हणून तो ताईसाहेबावर चिडला होता, आणि त्याच्या जातीच्या इतर माणसावरदेखील !

आतापर्यंत त्याने कधी अनुभवली नव्हती अशी एक नवी भीति त्याच्या मनात सूक्ष्मपणें वावरू लागली-ती म्हणजे माणसाची भीति !

त्या साऱ्या घटना सुखकारक नसल्या तरी त्याच्यावर नावीन्याचा मुलामा होता आणि शिवाय अजूनहि त्याला आधारभूत वाटणारी बय त्याच्याजवळ होती त्यामुळे तो त्या ठिकाणी रमून गेला होता.

आणि म्हणून टोपलीतल्या जिनसा संपल्यावर जेव्हा बय घरीं निघाली तेव्हा तो इतक्या लवकर घरीं जायला तयार होईना. पण बय मुळीं उठून चालू लागली तेव्हा तो तिचा हात ओढीत म्हणाला, " मंग मना चाय दे."

पण बयने हात हिसडला आणि ती खेकसून म्हणाली, " आपून न्हाई चाय प्यायचा."

भिकू म्हणाला, "पन त्ये लोक पित्यात त्ये?" बय ओरडली, "त्ये हायेत पैसेवाले."

भिकूच्या अशा अनेक इच्छा बयने मोडून काढल्या होत्या, पण आतापर्यंत हें चमत्कारिक कारण तिने त्याला सांगितलें नव्हतें निदान त्याच्या मनावर तें आज ठसलें तसें तें अजूनपर्यंत ठसले नव्हतें.

पैसा! म्हणजे बयच्या हातात तो पाहत असे त्या चिमुकल्या नाण्यांत इतकें सामर्थ्य होतें तर! ती खिशात असली म्हणजे लोक चहा भुर्र्-भुर्र् पिऊं शकतात, चांगले कपडे घालूं शकतात, सुंदर व ऐटबाज होऊं शकतात, लोकांचे नवे सदरे बेदरकारपणें मळवण्याइतके उन्मत्त होऊं शकतात. ह्या नाण्यामुळे माणसाची एक स्वतंत्र जात निर्माण होऊं शकते म्हणायची!

भिकूच्या डोक्यात उसळलेले विचार कदाचित् इतके व्यवस्थित आणि स्पष्ट नसतील, पण त्याच्या मानसिक वेदनात ते बीजरूपाने होते एवढें मात्र निश्चित.

...त्यानंतर बय दररोज त्याला बरोबर घेऊन जायची. पण आता तेथे जायची त्याची उत्सुकता हळूहळू मावळूं लागली बयची टोपली रिकामी होते कधी ह्याची तो वाट पाहूं लागला, आणि बाकड्यावर बसून भुर्र्-भुर्र् चहा पिणाऱ्या माणसाकडे पुन्हा-पुन्हा वळणारी आपली आगाळभूत नजर दुसरीकडे वळविण्याचा दुर्बल निश्चय त्याला पुन्हा-पुन्हा करावा लागे.

असे काही दिवस गेले मग एके दिवशीं रोज त्याच्याबरोबर येणारी बय त्याला म्हणाली, "भिक्या, तूच जा आज एकटा पेरू घेऊन. दिडकीला दोन द्यायचे हा. समाळून जा."

बयच्या त्या बोलण्याने भिकू स्तंभितच झाला बयच्या आधारा-शिवाय आपल्या घराबाहेरच्या जगात आपल्याला वावरावे लागेल अशी कल्पनाच त्याने कधी केली नव्हती. त्यामुळे त्या कल्पनेसरशी अनेक प्रकारची भीति त्याच्या पोटात उसळून आली बाह्य जगाचा परकेपणा आणि कठोरपणा ह्यांची जाणीव त्याला परत नव्याने आणि तीव्रतेने झाली.

तो एकदम रडूं लागला आणि म्हणाला, " मी नाय एकटा जानार. तू पन चल माझ्यासंग. "

बय म्हणाली, " नाय मला मजुरीवर जायचंय. "

" कशाला ? "

" पैसे मिलवायला. "

पण भिकूने आपला हट्ट सोडला नाही त्याला मनातून असें वाटत होतें की, बयला पैशापेक्षा आपल्या हट्टाची किमत नक्की अधिक वाटेल. पण त्याची ही अपेक्षा खोटी ठरली नेहमीची प्रेमळ बय त्या वेळीं विलक्षण कठोर झाली आणि कधी नव्हे इतक्या जोराने त्याच्या पाठींत तिने रट्टे मारले.

तो कळवळून म्हणाला, " मी जातों–जातो "

आणि पुन्हा-पुन्हा भरून येणारे डोळे पुसण्याचा निष्फळ प्रयत्न करीत, टोपलीच्या आणि दु खाच्या भाराने जड झालेलीं पावलें टाकीत तो रस्त्याला लागला. त्या रस्त्याने त्याला आता नेहमीच एकटें जायचें होतें. मुलानी दगड मारले, शिंगाडे बैल अंगावर धावून आले, आणि एकट्यानेच हॉटेलात चहा पिणाऱ्या माणसाचा जरी त्याला राग आला तरी ते त्याला कोणाला सागता आले नसतें कारण ज्या बयवर आपला पूर्ण हक्क आहे अशी त्याची कल्पना होती तीदेखील त्याची नव्हती भिकूपेक्षा मजुरी अधिक महत्त्वाची होती म्हणायची !

ही गोष्ट त्याच्या मनाला फार बोचली. त्याच्या स्वाभिमानाला फार धक्का बसला.

आणि वाटेत जेव्हा मुलानी त्याला फार त्रास दिला आणि मोटारींच्या अड्ड्यावर जेव्हा त्याला खूप वेळ बसून राहावें लागलें तेव्हा त्याचा असंतोष फार तीव्र झाला. साऱ्या लोकाविषयीं त्याला उघडउघड शत्रुत्व वाटूं लागलें. मित्रभाव सारा लोपला. किती दुष्ट होते ते सारे लोक ! भिकूकडून पेरू घ्यायला लागू नयेत म्हणून ते मोठमोठ्याने हसत, बोलत आणि भुर्र्-भुर्र् चहा पीत होते. आणि दुसरें कांही करण्यासारखें शिल्लक

राहिलें नाही म्हणजे मग मोठ्या नाखुषीने भिकूजवळून पेरू विकत घेत होते. आणि तेसुद्धा किती ? एक नाही तर दोन !

कारण भिकूला तेथे उन्हात तडफडत डाबून ठेवायचें होते ना त्याना ! कंटाळ्याने त्याचें मन ठणकावे अशी त्याची इच्छा होती नव्हे, एवढ्याच हेतूने त्याच्या आजूबाजूचे सारे व्यवहार चालले होते.

तो चिडला, वैतागला, असहाय ठरला. आणि एक कटु सत्य त्याच्या मनावर डागले गेलें की, त्याचे पेरू घेणारीं सारीं माणसें म्हणजे त्याच्या जीविताचे शास्ते होते आणि तो त्याच्या पायात लडथडणाऱ्या बेवारशी कुत्र्यासारखा होता.

असाच कितीतरी वेळ गेला आणि रडून-रडून अखेर एखादें मूल झोपीं जावें त्याप्रमाणे त्याचें मन तक्रारी करायचें थांबलें.

आणि इतक्यात एक मोठी गमतीदार घटना घडली धुळीचे लोटचे लोट उडवीत तेथे एक मोटार आली, आणि खाकी कपडे केलेले लाल तोंडाचे आडदाड बाप्ये तिच्यातून भराभरा उड्या टाकून उतरले.

त्याना पाहून माणसाची थोडी पळापळ झाली. पण भिकू मात्र वेड्यासारखा त्याच्याकडे पाहत राहिला त्याच्या घरासमोरून अशाच माणसानी भरलेल्या असल्याच मोटारी अलीकडे जाऊं लागल्या होत्या.

ते सोजीर विचित्र भाषेंत बडबडत होते आणि खिदळत होते. मग एकदम भिकूच्या पेरूंच्या टोपलीकडे त्याचें लक्ष गेलें आणि भराभरा त्याचे सगळे पेरू त्यानी खाऊन टाकले.

भिकू अगदी भेदरून गेला आणि मोठमोठ्याने रडूं लागला.

तेव्हा त्याच्यातला एक लठ्ठसा सोजीर हसला, आणि त्याने भिकूच्या अंगावर चार आणे भिरकावले त्यासरशी बाकीच्यानीहि हसत-हसत त्याच्या अंगावर नाणीं भिरकावलीं आणि तीं गोळा करतांना त्याची उडालेली तिरपीट पाहून तर ते खूपच हसूं लागले भिकूदेखील त्याच्याकडे पाहून मित्रत्वाच्या भावनेने हसला व ते जेव्हा मोटारीत बसून निघून गेले तेव्हा आपली रिकामी टोपली घेऊन मोठ्या आनदाने तो उड्या मारीत घरीं निघाला.

त्याच्या मनाच्या साऱ्या जखमा भरून निघाल्या होत्या निदान त्याला तरी तसें वाटत होतें भुताखेतानी भरलेल्या जगात देवदूत यावे तसे ते सोजीर त्याला भासले. त्याच्या मनातला द्वेष मावळला, कटुता लोपली, मित्रभाव जागृत झाला, आणि पळत जाऊन आपल्या बयाच्या गळ्यात मिठी मारावी असें त्याला वाटू लागलें.

त्याच्याजवळचे पैसे पाहून तिला खूप आनंद होणार होता. ती त्याला प्रेमाने कुरवाळणार होती. तो तिला आपल्या साऱ्या तक्रारी सागणार होता त्या सोजिराचे रसभरित वर्णन करणार होता. आणि कदाचित् ती त्याला म्हणणार होती, "नग जाऊ तू आता पेरू विकायला..."

कितीतरी वेळ घरचा रस्ता संपेच ना शेवटीं तो संपत आला एकदाचा, आणि तो घराजवळ आला तो समोरच डोक्यावर शेणाची मोठी टोपली घेऊन चाललेली बय त्याला दिसली. तशी तिला मोठ्याने हाका मारीत तो धावूं लागला.

पण इतक्यात त्याच्यामागून सोजिरांची एक मोटार भरधाव आली. तिच्यातले सोजीर मोठमोठ्याने हसत होते, गात होते आणि ओरडतदेखील होते. त्याना पाहून भिकूदेखील हात हलवीत मोठमोठ्याने ओरडला. इतका मित्रभाव त्याला त्याच्याविषयी वाटत होता.

बय मागे वळून त्या ओरड्याकडे पाहूं लागली तिच्याकडे एका सोजिराचें लक्ष गेलें आणि तो कायसें ओरडला त्याबरोबर दुसरेहि तिच्याकडे पाहू लागले आणि मग सारेच काहीसें मोठ्याने ओरडले त्याची मोटार बयजवळ येऊन अचानक थाबली आणि मोटारीतून धडाधड उड्या मारून ते बयेकडे धावले.

भिकूला क्षणभर वाटले की, बयलादेखील आपल्याप्रमाणेच ते पैसे देणार आहेत आणि म्हणून तो खुदकन् हसलादेखील. पण तें क्षणभरच—

दुसऱ्याच क्षणीं समोरचें दृश्य पाहून तो स्तंभित झाला. ते सोजीर बयला पकडीत होते, मारीत होते आणि ओढीत होते, व बय मोठमोठ्याने किंकाळ्या फोडीत होती.

काय होतें आहे तें त्याला कळेना. कांही वेळापूर्वी चागल्या असणाऱ्या सोजिराचे जातभाई आता एकदम वाईट कसे झाले होते ? ते बयला ओढीत आणि मारीत कां होते ? बयने त्यांचें काय केलें होतें ? बयच्या मदतीला कोणीच कसें धावून येत नव्हतें ? चागलें आणि वाईट ह्यांतला फरक तरी काय होता ?

दुबळेपणाने तो पुढे धावला आणि बयला ओढूं लागला पण एका सोजिराने खिळ्याच्या बुटाची लाथ त्याच्या कमरेंत मारली आणि तो खाली कोसळला

असह्य शारीरिक वेदनेने तो व्याकुळ झाला आणि तेवढ्या वेळात बयला मोटारींत घालून ते निघून गेलेदेखील फक्त एक बयची आरोळी तेवढी त्याला ऐकूं आली

भिकू पांढरा फटफटीत पडला होता त्याला हालतां येत नव्हते अगर बोलता येत नव्हतें त्याला काहीच समजेनासें झालें होतें. त्याची बय सोजिरानी पळवून नेली होती. त्याच्या जीविताचा आधार, आसरा, केंद्रबिंदु गेला होता. बयच्याशिवाय जीवित कसे असूं शकेल ह्याची त्याला कल्पनाच करता येईना.

सारेंच अगम्य आणि अतर्क्य होते अज्ञात, काळ्याकुट्ट, भयानक अशा शक्तीच्या कचाट्यात सापडून त्याचें जीवित च्छिन्नविच्छिन्न झालें होतें.

खऱ्याखुऱ्या जगाची पहिली ओळख त्याला होत होती

# शितकण

हेरून ठेवलेल्या हतभागी माणसाच्या नरड्यावर टाचा रोवीत मृत्यूच्या पिसाट नृत्याचा थयथयाट चाललेला असतो विश्वरचनेच्या गूढ आणि निष्ठुर नियमानुसार त्याची पावले पडत असतात. आणि जीविताच्या भरल्या ताटावरून कोणीतरी, कसातरी, केव्हातरी निघून जातो–अगतिकपणें, अनिच्छेने !

टाहो फोडून सुरू केलेली जीवितयात्रा मनुष्य आचके देत-देत आटपतो सचेतन आणि अचेतन विश्वाच्या मर्यादा परस्पराना भिडतात. सान्ताची मर्यादा सपते, आणि अनंताची दृष्टिभेट झाल्याचा भास होतो. कार्यकारणाची साखळी तुटते जीविताच्या भातुकलींतलें आणखी एक बुडकुलें कलंडतें.

असें झालें म्हणजे कोणी भयभीत होतात, कोणी दुःखातिशयाने टाहो फोडतात, व कोणी एखादा हे गूढ उकलण्याच्या महत्त्वाकांक्षेनें कधी न सपणाऱ्या तत्त्वचिंतनाच्या मार्गावरून दूरवर चालत जातो. पण बहुतेकांना मृत्यूच्या रुद्रवीणेचे हे झंकार ऐकूंच येत नाहीत जीविताचीं शितें वेचण्यात ते बापडे इतके गढून गेलेले असतात...

जवळपासचे कोणी म्हणतात, 'कटकट चुकली !', कोणी म्हणतात, 'ईश्वरेच्छा !', आणि काही खुळयाना वाटतें की, आपण आता कायमचीं अनाथ झालों. आपल्या जीविताचा गाडा आता येथेच खोळंबून राहणार !

परंतु काळ मात्र साऱ्याच माणसांच्या गळयात अडकाविलेल्या भवितव्याच्या दोऱ्यांनी त्याना टराटरा ओढीत नेत असतो. क्षणाक्षणाला अज्ञात भविष्याच्या खाईंत भिरकावून देत असतो.

आणि तरी माणसें, ह्या काळपुरुषाची नजर चुकवून, जीविताचा

जुगार खेळत असतात व्यक्तिमत्त्व, समाज, संस्कृति, इतिहास, असल्या हास्यास्पद कल्पनाचे डोलारे रचीत असतात विश्वशक्तीवर विजय मिळविण्याच्या वल्गना करतात घड्याळाच्या टिकटिकीत आपण कालाला कोंडलें आहे अशा खुळ्या समजुतीने जगात वावरत असतात

मृत्यूच्या ह्या 'भयंकर लोकप्रिय' नाटकाचा खेळ, त्या दिवशी, मुंबईतल्या कुठच्याशा गल्लीतल्या, कुठच्याशा इमारतीतील एका खोलीत घडत होता. रंगीबेरंगी औषधाच्या बाटल्या, इंजेक्शनच्या चपट्या डब्या, शेकायच्या पिशव्या आणि चिमुकले थर्मामिटर ही सारी विचित्र आयुधें तेथे ओशाळलेले चेहरे करून एका कोपऱ्यात बसली होतीं प्यायच्या पाण्याचा गरगरीत ताब्या निगरगट्टपणें उशाशी ठाण माडून बसला होता उशाचे चेहरे मलूल झाले होते नि स्तब्ध शाततेचें इंजेक्शन् कोणीसें त्या खोलीला दिलें होतें. आणि दूर एका कोपऱ्यात एक सुबक घड्याळ अखेरच्या क्षणाची अगदी सावकाशपणें आणि निर्विकारपणें मोजदाद करीत होतें.

टिक्.. टिक्...टिक्...टिक् ..

गोविंदराव आपल्या बायकोचें डोके माडीवर घेऊन बसले होते. तोंडात गगाजलाचे थेब सोडीत होते आणि शारदाबाईंच्या दर आचक्यागणिक असह्य उमाळ्यानी त्याचा कठ दाटून जात होता आपलें शरीर हलकें, रिकामें आणि बधिर झाल्यासारखे त्याना वाटत होते त्या देहाला होणाऱ्या यातना आपण तितक्याच तीव्रतेने अनुभविण्याचा त्याचा वेडा प्रयत्न चालला होता. आणि तो यशस्वी होत नाही म्हणून त्याना विलक्षण खंत वाटत होती. आणि त्याच्या मनात सारखा आक्रोश चालला होता की, 'हें कोणाला थाबविता येणार नाही काय ?'...

मग डॉक्टर किंचित् खोकले, आणि गर्दीचा त्रास होऊं नये म्हणून नाटक सपायच्या आधीच गडबडीने उठून जाणाऱ्या प्रेक्षकाप्रमाणे निघून गेले.

आणि त्यामुळे गोविंदरावाच्या मनातील ताणली गेलेली सहानुभूतीची तार तुटली. सहानुभूति दाखविण्याची त्याच्या मनाची शक्तीच नष्ट झाली. त्यांना वाटलें की, आता इथून उठून जावे. दूर कुठेतरी पळून जावें...ह्या

वेळेला आपल्या ऑफिसांतले लोक चहा पीत असतील...भित्रटपणाने खोलीच्या बाहेरच येरझारा घालणाऱ्या आणि मध्येच खोलींत डोकावून पाहणाऱ्या आपल्या मुलाचा त्याना विलक्षण संताप आला...आणि त्याच्या मनात कोणीसे अधीरपणे किंचाळले, 'संपणार तरी केव्हा हें सगळें?'...

आणि यथावकाश तें सारें आटपलें.

गोविंदराव चटकन् उठून बाहेर आले त्याचा मोठा मुलगा हालवारे करीत धावत एका कोपऱ्यात गेला आणि अशा वेळीं दु ख कसें व्यक्त करायचे असते? असा वेडपट प्रश्न त्याच्या मनात उभा राहिला कुठच्याशा मासिकात चार गोष्टी खरडणाऱ्या त्या मुलाला कृत्रिम आणि रोगट भावनाचीं आदोलनें अनुभवायची इतकी सवय झाली होती की खरी भावना अनुभवण्यास त्याचें मन असमर्थ झालें होतें

गोविंदरावाची धाकटी मुलगी भेदरून जागच्या जागीं उभी राहिली होती तिला पोटाशीं धरत ते उसनें हसून म्हणाले, "रडूं नको, निर्मला, तूं! मी तुला एक आणा देईन हं" आणि मग गडी तिला चटकन् बाहेर घेऊन गेला.

काहीतरी करायचें म्हणून गोविंदरावानी घड्याळाकडे पाहिलें. आणि मग एक अनिवार उमाळा आला, व ते एखाद्या लहान मुलासारखे रडूं लागले. आपण असें का करतो आहों तें त्याना समजत नव्हतें. आपल्या-भोवतीच्या साऱ्या वस्तू आणि माणसें आपणापासून कुठेतरी खूप दूर आहेत असें त्याना वाटत होतें सारें जग पारदर्शक झाल्यासारखें त्याना दिसलें आणि आपण एकाकी अलिप्त असे कुठच्याशा तरल अवस्थेंत तरंगत आहोंत अशी जाणीव त्याच्या बधिर मनाला अगदी पुसटपणें होत होती.

थोड्या वेळाने हें विशुद्ध दु ख ओसरलें. आणि मग मनाच्या बधिर अवस्थेंतदेखील कृत्रिम स्वयकेंद्रित विचार-विकारांचे खेळ त्याच्या मनांत सुरू झाले. त्याना वाटूं लागलें की, आपण रडल्यामुळे लोकाना आपल्या पत्नीवरच्या आपल्या उत्कट प्रेमाची जाणीव झाली असेल...तिच्या स्मृतीनिमित्त कुठच्याशा संस्थेला देणगी दिली पाहिजे. अगदी शंभर

रुपयांची...पण नको, पन्नासच...आणि मग रस्त्यांतून जाणारी एक सुंदर बाई पाहून त्याना वाटलें, ' अरे, आता आपलें हें सुख संपलें ! '...आणि मग स्वत:चीच शरम वाटून त्यानी आपल्या धोतराच्या सोग्याचा बोळा तोंडात कोंबला.

त्या दिवशीं अनेक परक्या लोकानी आपापल्या विचित्र पद्धतीने गोविंदरावाना सहानुभूति दाखविली. त्याच्या घरीं तात्पुरत्या आलेल्या कोणीशा नातेवाईक बाईने त्यानी संध्याकाळीं चार घास भात तरी जेवलाच पाहिजे असा विलक्षण आग्रह केला समोरच्या घरातलीं दोन माणसें मोठमोठ्याने हसत होती ती, गोविंदराव आपल्याकडे पाहत आहेत असें वाटताच, हसायचीं थांबलीं ते नळावर गेले तशी एका बाईने आपली बालदी चटकन् बाजूला केली. आणि शेजारच्या एका गोड छोकऱ्याने त्याच्याजवळ भीत-भीत येऊन त्याना आपल्या गोष्टीच्या पुस्तकातली एक लाबलचक गोष्ट सागितली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर गोविंदराव आपल्या मुलाला म्हणाले, " मी रात्रीं तीनदा जागा झालो. सारखें वाटायचे की ती कशाला तरी हाका मारत्ये आहे. "

आणि मुलगा म्हणाला, " चहा वगैरे काही नको बुवा मला. अगदी बेचैन वाटते आहे. स्वस्थ पडून राहणार आहे मी. " आणि मान तिरपी करून व पाय वाकडे करून तो बिछान्यावर झोपून राहिला

दोघेहि अर्थात् खोटें बोलत होते कारण मनावरचा असह्य ताण नष्ट झाल्यामुळे दोघाचीहि मन:स्थिति शात झाली होती. पण मृत माणसा-विषयीं प्रेम व्यक्त करण्याकरिता त्याना हा चमत्कारिक आडमार्ग पकडावा लागला होता.

मग माणसें समाचाराला येऊ लागलीं. शारदाबाईंची बहीण आली तीच मुळीं मुसमुसत. गोविंदरावांच्या छोट्या मुलीला तिने पोटाशीं धरून कुरवाळलें. आणि त्याच्या मोठ्या मुलाला ती म्हणाली, " काय रे, असें हें झालें ? का रे, असें होतें हें ? परवा तर मी तिला भेटून गेलें..." थोड्या

वेळाने रडणें आवरलें. “ गेली बिचारी ! अहेवपणीं गेली पण माझें मात्र नशीब फुटकें. हे होते ” (इथे आवाज परत रडका झाला) “ तोंपर्यंत ह्यानी अगदी काहीसुद्धा कमी केलें नाही आणि शेवटीं जातानादेखील त्यानी मला मुद्दाम जवळ बोलावून सागितलें की...”

आणि आतापर्यंत अनेक लोकाना अनेक वेळा सागण्यात आलेली हृदयद्रावक कहाणी परत तपशीलवार सागण्यात आली व बिचाऱ्या गोविंद-रावानाच सात्वन करणाऱ्या माणसाची भूमिका पत्करावी लागली.

जितक्या वेगाने तो दु खाचा उमाळा आला होता, तितक्याच वेगाने तो निघून गेला आणि मग हकिकती, चौकशा, तपशील ह्याची नैसर्गिक हौस जागी झाली

गोविंदराव उत्तर देऊं लागले, “ त्याचें असें झालें ..”

त्याच वेळेला त्याचा मुलगाहि बोलूं लागला. आपले लहानसहान अनुभवदेखील खुलवून आणि खुलासेवार सागण्याची त्याला चमत्कारिक हौस होती. गोविंदराव अडखळले आणि थाबले. मग मुलगाहि शरमून बोलायचा थाबला असा चमत्कारिक गोधळ क्षणभर चालला.

मग गोविंदराव परत बोलू लागले, “ परवा मळभट आलें होते आणि हवा जरा वाईट पडली होती. त्याचा एकदम परिणाम झाला तिच्या प्रकृतीवर. ”

“ हो, नाही तरी मेली हवा वाईटच पडली होती. मालाडला आमचीं कलमें आहेत ना, त्याच्यावरचा सगळा मोहोर पहा गळून पडला ह्या मळभटामुळे. यंदा अगदी खायलासुद्धा आबे मिळायचे नाहीत मग चार लोकाना द्यायची गोष्टच राहूं द्या...” आणि असेंच आपल्या नादांत शारदाबाईची बहीण खूप बडबडली

पण आपल्या दु खाचें प्रदर्शन करायचा मोका सोडायला गोविंदराव तयार नव्हते. ते म्हणाले, “ तर काय झालें, त्या दिवशीं रात्रीं बारा वाजता तिला एकदम ताप आला पहा...”

“ बारा नाही हो, दीड वाजता.” त्यांचा मुलगा मध्येच तोंड खुपसून

म्हणाला. आपण काहीतरी महत्त्वाचा मतभेद व्यक्त केला आहे असा भाव त्याच्या चेहऱ्यावर होता. आणि त्यामुळे तो अधिकच हट्टी आणि मूर्ख दिसत होता.

"छे रे ! बाराच, सिनेमांच्या गाड्या जात होत्या त्या वेळेला." गोविंदराव ठासून म्हणाले.

"छे हो..."

आणि अशा थाटात शारदाबाईच्या मृत्यूची तपशीलवार हकीकत त्याच्या बहिणीला सांगितली गेली.

तोपर्यंत आपल्या मुलाच्या शिक्षणाविषयीं कोणालातरी विश्वासात घेऊन सारी हकीकत सांगावी असे त्या बहिणीला वाटूं लागले होतें आणि तीं तीन माणसें शारदाबाईच्या मृत्यूव्यतिरिक्त इतर तीन निरनिराळ्या विषयावर एकाच वेळीं बोलत राहिलीं.

मग त्याचा एकडोळ्याचा दाणेवाला आला आणि खोलीचा पडदा बाजूला करून घरात डोकावत म्हणाला, "काय, बाई ? कशी आहे तब्येत आज ?"

त्याला जेव्हा खरी हकीकत कळली तेव्हा चार औपचारिक वाक्यें तो बोलला, आणि प्रसंगाचा गंभीरपणा ओळखून तो गोविंदरावाच्या धाकट्या मुलीला बाजूला बोलावून हलक्या आवाजात म्हणाला, "जरा आमचा तेवढा तुपाचा डबा द्या म्हणजे झाला..."

त्यानंतर जाता-जाता गोविंदरावाना एकदा बिलाची आठवण करावी असा त्याचा बेत होता. पण सहानुभूति दाखवायची माणसाला इतकी हौस असते की तो म्हणाला, "आता छोकरा लोकाचा कसा होएल ? तुमी आता दुसरी बाई करा."

गोविंदरावानी चपापून त्याच्याकडे पाहिलें. आणि हातवारे करून ती कल्पना झिडकारून टाकल्यासारखें केलें.

पण त्या बिचाऱ्या दाणेवाल्याचा त्यांत काय दोष ? जीवित हें किराणा मालाच्या व्यापारासारखें आहे अशी त्याची परंपरागत कल्पना होती.

आणि साखरेच्या गोणी संपल्यावर जसा नवीन माल आणायचा तसेंच एक बायको मेल्यावर दुसरी करायची, अशी प्रथा तो आजपर्यंत पाळीत आला होता

गोविंदराव स्वत शीच उच्च नैतिक भूमिकेवरून म्हणाले, "काय हरामखोर असते ही दाणेवाल्याची जात ! इतक्या दिवसाची सोबतीण सोडून गेली, तर असले का विचार करायचे ? आणि आता वय का आहे माझें लग्नाचें ? आम्हीहि आलो आहोत आता सोनापुराच्या कोपऱ्यापर्यंत आणि खरें म्हटलें म्हणजे कसलीहि इच्छा राहिलेली नाही माझी. ससार व्हायचा तो नीटपणें झाला मुलगा मोठा झालेला आहे आता तोच पाहील सगळें. " आणि आपला चेहरा शक्य तितका निरिच्छ आणि निर्विकार करण्याचा त्यानी प्रयत्न केला. म्हणजे त्यानी भुवया चढवल्या, दोन्ही हात डोक्यावर ठेवून परस्परात अडकवले, आणि ते खिडकींतून दिसणाऱ्या आकाशाच्या तुकड्या-कडे पाहूं लागले

त्यानंतर चार-पाच गृहस्थ गंभीर चेहरे करून समाचाराला आले. त्यातले एक तत्त्वज्ञ म्हणाले, " मनुष्य आपलें-आपलें म्हणून सगळें करीत असतो. पण शेवटीं. " आणि ह्यापुढे काय बोलावे हें न समजल्यामुळे त्यानी नुसताच तोडाचा चंबू केला, आणि आपल्या मोठ्या पोटावर ते हलके-हलके थापट्या मारूं लागले.

स्वत ला विनोदी समजणारे लाबोडक्या डोक्याचे एक गृहस्थ म्हणाले, " हल्लीच्या दिवसात मरणेंसुद्धा अगदी महाग होऊन बसलें आहे. " आणि मग आपण केलेला विनोद अस्थानी होता अशी नेहमी-प्रमाणेच शंका येऊन त्याचें डोके अधिकच लांबोडके दिसूं लागले

तिसरे गृहस्थ नुसतेच शून्यपणें समोरच्या भिंतीकडे पाहत राहिले. चवथ्या गृहस्थानी मरणाच्या चमत्कारिक हकिकती सागायला सुरुवात केली. आणि स्वतःला धूर्त समजणाऱ्या पाचव्या गृहस्थाना आपला धूर्तपणा कसा व्यक्त करावा तें समजेना.

गोविंदरावानी आपण आता कसे अगदी विरक्त झालों आहोंत तें

फाजील उत्साहाने सांगितलें. आणि दुसरें लग्न करायला सांगणाऱ्या दाणेवाल्याचा हसत-हसत तुच्छतापूर्वक निर्देश करायला ते विसरले नाहीत.

स्वत ला धूर्त समजणाऱ्या त्या गृहस्थानी नंतर इतराना सागितलें, " मीं पाहिलें एकंदरींत. गोविंदरावाचा दुसरें लग्न करण्याचा विचार दिसतो आहे. " अर्थात्च हें सगळयानाच पटलें. आणि आपण धूर्त आहोत ही त्या गृहस्थाची समजूत अधिकच दृढ झाली.

त्या दिवशी गोविंदरावानी स्वतःचें दु ख व्यक्त करून दुसऱ्याच्या सहानुभूतीचा विषय होण्याचें सौख्य यथेच्छ मिळविलें. इतकें की शेवटी त्याना वाटूं लागलें, आता आपल्याला नैसर्गिकपणें बोलायला आणि हसायला मिळणार तरी केव्हा ?

सध्याकाळीं ते आरामखुर्चीत बसलेले असताना, त्याना आपल्या छोट्या मुलीच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. त्यासरशी ते कावरेबावरे झाले. चटकन् घरात जाऊन त्यानी तिला उचलून बाहेर आणलें आणि पोटाशीं धरून कुरवाळलें मग मोठ्याने रागावून ते म्हणाले, "कोणीं रे रडवली तिला, आं ? लहान मुलाला सभाळून नको का घ्यायला जरा ? आता आई आहे का तिची ? " आणि परत त्यानी तिला कुरवाळलें. लहान मुलावरचें प्रेम व्यक्त करायचा हाच एक ओबडधोबड मार्ग त्याना माहीत होता.

पण त्या मुलीला असले कोडकौतुक नको होतें तिला आई दररोज सध्याकाळीं देत असे त्याप्रमाणे साय खायला हवी होती. आणि आपल्या झोपायच्या गादीवर नेहमीची निळी चादर हवी असा तिचा हट्ट होता. हे दोन्ही हट्ट पुरवणें गोविंदरावाना जमलें नाही. दुधावरची साय विरजणात गेली होती. आणि निळी चादर त्याना कुठे सापडेना. त्यामुळे ते अगदी काकुळतीला आले. पण मुलीचें रडणें थाबेना, आणि शेवटीं रडत-रडतच ती झोपीं गेली.

गोविंदराव खिन्न मनाने खिडकीबाहेर पाहत उभे राहिले. काहीतरी मार्ग काढला पाहिजे, निरवानिरव केली पाहिजे, असें त्याना फार उत्कटतेने वाटूं लागलें. मग त्यांना एक कल्पना सुचली. ते आपल्या मुलाजवळ गेले.

मुलगा आपल्या आईच्या मृत्यूबाबत दोन ओळी वर्तमानपत्रांत देण्याकरिता लिहीत होता आणि आपलें दु ख व्यक्त करणाऱ्या एका कवितेच्या फार सुंदर ओळी आपण शोधून काढल्या ह्याचा त्याला विलक्षण आनंद वाटत होता. त्या बिचाऱ्याला साहित्यातील संकेताच्या मदतीशिवाय एखादी भावना अनुभविणेंच अशक्य झालें होतें

गोविंदराव मुलाला गंभीरपणें म्हणाले, " हें पाहा, राजा, घरांत आता ही अशी परिस्थिति आहे. तेव्हा तूं आता लग्न केलेंस तर बरें. म्हणजे घर नीट चालेल. निर्मलाचे हाल व्हायचे नाहीत. "

मुलगा एकदम बावरला. आणि तो घुटमळत म्हणाला, " नको बुवा इतक्यात्. लोक काय म्हणतील ? "

पण त्याला म्हणायचें होतें, " हें काय हें, नाना, तुमचें विचारणें ? आई आता नुक्तीच सोडून गेलेली असताना असला विचार माझ्या मनात कालत्रयींहि येणें शक्य नाही "

गोविंदराव म्हणाले, "लोक काय म्हणतील त्याची नको तुला काळजी तुला लग्न करायचें आहे की नाही तें साग."

"पण नको बुवा इतक्यात् म्हणजे त्याचें असें .."

" म्हणजे ? कुठे प्रेमात वगैरे सापडला आहेस की काय ? "

तो घाबरून म्हणाला, "नाही, नाही छे, छे."

पण त्याला असें म्हणायला आवडले असतें की, "नाना, तुमच्या दरडावणीला मी भीक घालीन असं तुम्हाला वाटत असेल तर ती कल्पना चुकीची आहे. माझें ज्या मुलीवर प्रेम जडलें आहे तिला मी कदापि अंतर देणार नाही ज्या माणसाला प्रीतीचा साक्षात्कार झाला आहे..."

गोविंदराव म्हणाले, " मग कुठे अडतें आहे ? "

" पाहा बुवा, तुमचें सगळ्याचेंच मत असलें तर मग..."

...त्यानंतर काही दिवसानी कुठच्याशा मासिकात एक गोष्ट प्रसिद्ध झाली. आपलें सारें जीवित देशसेवेंत व्यतीत करण्याची इच्छा असलेल्या तरुणाला, त्याच्या इच्छेविरुद्ध सासारिक जबाबदाऱ्या कशा पत्कराव्या

लागल्या, आणि त्यामुळे त्याच्या जीविताचें पुष्प कसें चुरगळलें गेलें, ह्याचें हृदयद्रावक चित्र त्या कथेंत होतें. आणि महाराष्ट्रातल्या तरुण पिढीला ती गोष्ट फार आवडली .

दिवस चालले होते गतगोष्टींवर काळ फावड्याने माती लोटीत होता एक दिवस संध्याकाळीं घरीं आल्यावर गोविंदरावाच्या ध्यानात आलें की, आज संबंध दिवसात आपल्याला बायकोची आठवण झाली नाही ह्यामुळे त्याच्या मनाला फार चुटपुटदेखील वाटेनाशी झाली

पण एक रात्रीं गोविंदराव एकदम जागे झाले. त्याना वाटलें की, आपली बायको आपल्याला हाका मारते आहे. तिला प्यायला पाणी हवें आहे.

म्हणून ते गडबडीने उठून म्हणाले, "ओ, आलो हा" आणि मग त्याना आठवलें की, ती आता नाही

...आपलें सारें शरीर अचेतन झाल्यासारखें त्यांना वाटलें विलक्षण रिकामेपणाने त्याचें हृदय भरून आलें कालगति कर्कश ब्रेक लागून थाबली. वस्तुमात्रांतील अर्थ आणि संगति नष्ट झाली ..

आपोआप उठून ते आत गेले आणि ती ज्या ठिकाणीं मेली तेथे तेवणाऱ्या दिव्याकडे पाहत राहिले. अनेक आठवणींनी त्याच्या मनात गर्दी केली.

...लग्नाच्या वेळीं वाजणाऱ्या वाद्याचा कर्कश स्वर.. तिच्या केसात अडकलेल्या अक्षता...बाहेर जाताना होणारा तिचा नोकझोक.. ती टपोरी मोहनमाळ...राजाला एकदा तिने केरसुणीने बडवलें होतें, तेव्हाचा तिचा अवतार...पोळ्या करताना घामाने भिजून गेलेली तिची चोळी. .आजारीपणात, 'मला कंटाळा आला आहे. इथे माझ्याजवळ बसा' असें विनवत असताना जखमी जनावराच्या डोळ्याप्रमाणे दिसणारे तिचे डोळे ..

...तिच्या आवाजातला सूक्ष्म गोडवा...खराब झालेलें तिच्या हाताच्या किरांगळीचें नख...ती ऋतुमती असता तिच्या चेहऱ्यात होणारा सूक्ष्म फरक...तिच्या केसांचा सुगंध...आणि घामाचा वास...

हें सारें-सारें त्यांना परत हवें होतें. बोहल्यावर उभे राहिल्यापासूनचें

सारें जीवित त्याना परत जगायचें होतें फक्त एकदाच. पण तें आता कदापि शक्य नव्हतें-अगदी कधीहि !

आपोआप त्याच्या डोळ्यातून टिपें ओघळलीं. परत एखाद्या लहान मुलासारखे ते रडूं लागले.

तेवढ्यात त्याची छोटी मुलगी जागी झाली. आश्चर्याने आणि भीतीने आपल्या रडणाऱ्या बापाकडे ती पाहत राहिली. आणि मग भीत-भीत पुढे सरकून ती समजावणीच्या स्वरात म्हणाली, "नाना, तुम्हीं रडूं नका. मी तुम्हाला एक आणा देईन. हं"

पण त्यामुळे नाना अधिकच रडूं लागले. आणि म्हणून मग ती-देखील रडूं लागली.

# नावीन्य

हातातला लाडू सदऱ्याखाली लपवीत शरद् गच्चीवर आला आणि विजयाच्या नशेत त्याने लाडवाला एक खुसखुशीत डास मारला पण ह्या प्रयत्नात आकाशात गेलेलीं त्याचीं बुबुळें जेव्हा परत गच्चीवर आलीं तेव्हा धरणीकंप झाल्यावर जसा धक्का बसावा तसा त्याला धक्का बसला.

त्याच्यासमोरच शशी उभा होता. आपल्या शत्रूला लाच देऊन वश करावें की धमक्या देऊन घाबरवून सोडावे हे 'सामान्य प्रश्नां'तलें कठीण गणित त्याचें डोकें सोडवूं लागलें. पण शशीचे इकडे लक्षच नव्हते. तो आकाशाकडे तोंड उघडून पाहत होता आणि तोंडात कात्री घालीत होता.

तें पाहून शरद् आश्चर्याने म्हणाला, " काय करतो आहेस, रे ? "

शशीने एकदम दचकून त्याच्याकडे पाहिलें आणि कात्री लपवीत तो म्हणाला, " काही नाही. माझे दात कापून टाकतो आहे. "

" दात कापतो आहेस ? आणि ते कशाला ? "

" अरे, मला बाबाच्यासारखी दाताची कवळी घ्यायची आहे. मग खूप गंमत होईल. सकाळी उठल्यावर तोंड धुवायलाच नको ! एकदम आपला चहा प्यायचा. सदू गडी धुईल माझे दात आणि मी ते फटकन् तोंडात टाकीन ! " शशीने स्पष्टीकरण केलें.

शशीची कल्पना निदान शरदला तरी फार मौलिक वाटली कारण तोंड न धुण्याबद्दल सकाळींच आईने त्याला बडवलें होतें. पण त्याच वेळीं आरोग्यशास्त्राचें एकुणपन्नासावे पान फट्दिशी त्याच्या डोळ्यासमोर आलें आणि तो ओरडला, " आपल्याला दातामुळंच अन्न चविष्ट लागतं. "

ही माहिती मिळताच शशीला एकदम धक्काच बसला दात कापण्यात इतका भयंकर धोका असेल ह्याची त्याला कल्पना नव्हती कुंदाच्या खेळाच्या

पिशवीसारखें त्याचें डोकें विचारानी भरून गेलें ! आणि तो गंभीरपणें जिना उतरू लागला आणि शरद् इतका वेळ पाठीमागे लपविलेला लाडू निर्धास्तपणें खाऊं लागला.

शशी खाली गेला तेव्हा बाबा खुर्चीवर वर्तमानपत्र वाचीत बसले होते, आणि त्याच्यासमोर त्याची दाताची कवळी होती.

करुणामय दृष्टीने शशी बाबाच्याकडे पाहत राहिला. तेव्हा बाबा म्हणाले, " काय, रे ? "

शशी हलक्या आवाजांत म्हणाला, " बाबा, तुम्हीं दाताची कवळी लावता म्हणून तुम्हाला पेढा गोड नाही का हो लागत ? "

बाबा म्हणाले, "काय करणार, बाबा ! म्हातारा झालो ना मी आता "

शशी विचारमग्न अवस्थेंत म्हणाला, " मग तुम्हीं रडत कसे नाही ? "

बावाना वर्तमानपत्र वाचण्याच्या तंद्रीत हा प्रश्न ऐकू गेला नाही. पण शशी मात्र तसाच त्याच्याकडे दयाबुद्धीने पाहत राहिला त्याला ताप आलेला असताना " दोन दिवस काही खाऊं नको " असें डॉक्टरानी सागितलें होतें तेव्हा त्याने रडून गोधळ केला होता पण बापडे बाबा मात्र गुपचूप वर्तमान-पत्र वाचीत बसले होते. शशीचा कठ सहानुभूतीने दाटला लाडवाचा फार मोठा तुकडा गिळात्यासारखें त्याला वाटले आणि त्याने असा निश्चय केला की, बाबाना आपले निदान चार...नको, दोनच...तरी दात द्यायचे. मग आपल्याला पेढा थोडा कमी गोड लागला तरी हरकत नाही !

ह्या उदात्त विचाराच्या तंद्रीतच तो खिडकीजवळ आला. खाली रस्त्याजवळ एक घोडा गवत खात होता. शशीला प्रश्न पडला, घोड्यांना तरी दात असतात की नाही कोण जाणे !

पण घोड्याने त्याला ह्या शंकेंत फार वेळ ठेवलें नाही. तो मान वर करून मोठ्याने खिकाळला आणि आपले जबरदस्त दात त्याने शशीला दाखविलें आणि आपल्या डोक्यावरचें एक मोठें ओझें उतरलें असें शशीला वाटलें. तो मोठ्याने ओरडला, " अय्या ! घोड्याला दात असतात ! " आणि ही महत्त्वपूर्ण माहिती कोणालातरी सागण्याकरिता तो घरांत पळाला.

घरांत छोटी कुंदा तिच्या ' यमू ' ची वेणी घालीत होती.. म्हणजेच पलंगाच्या पायाला बांधलेल्या दोन-चार चिंध्या परस्परात गुंतवीत होती. शशी धावत तिच्याजवळ गेला. तशी ती एकदम किंचाळली, " बघ, माझी तेलाची वाटी उपडी केलीस ! "

शशी घाबरून म्हणाला, " अग, पण कुठं आहे तुझी वाटी ? "

" इथं ठेवली होती मीं. " शशीच्या पायाखालची जागा दाखवीत ती म्हणाली.

शशी म्हणाला, " अग, पण माझ्या पायाला लागत नाही ती. "

साध्या गोष्टीदेखील शशीला कशा समजत नाहीत ह्याचें कुंदाला आश्चर्य वाटलें आणि ती चिडून म्हणाली, " अरे, माझी खोटी-खोटी आहे वाटी. तुला कांऽऽही समजत नाही. " आणि यमूला एक रपाटा मारून ती म्हणाली, " मान सरळ ठेव म्हटलं ना ? सारख्या माना वाकड्या करीत असते मेली ! "

अलीकडे कुंदाची ' यमू ' फार द्वाड झाली होती. वेणी घालायला किती हाका मारल्या तरी ती येत नसे फुलाच्या वेणीकरिता उगीचच्या उगीच रडायची ! आणि भातावर कितीहि दहीं घातलें तरी तिला पुरें होत नसे. त्यामुळे वैतागून कुंदा म्हणायची, " नको ग ऽ ऽ बाई हीं पोरं ! "

शशी मात्र कुंदाकडे आश्चर्यानें पाहत राहिला. खोटी-खोटी तेलाची वाटी कशी असूं शकेल ह्याचाच त्याला उलगडा होईना ! कारण खरें आणि खोटें ह्यांमधील रेषा त्याच्या मनात नेहमीच स्पष्ट असत. आणि कल्पना करण्यापेक्षा विचार करण्याकडेच त्याची प्रवृत्ति अधिक होती. त्याला वाटलें की, कुंदाला खात्रीने वेड लागलें आहे. वेड लागलेल्या माणसाला लोक दगड मारतात हें त्याने पाहिलें होतें. आणि लोकानी दगड मारल्यावर कुंदाच्या डोक्याला भोक पडेल आणि भोक पडल्यावर वेणी घालताना तें दुखेल हें त्या हुषार मुलाच्या तेव्हाच ध्यानांत आलें दयेने ओथंबलेल्या दृष्टीने शशी कुंदाकडे पाहूं लागला. आणि शशीच्या अनेक काळज्यांनी भरलेल्या डोक्यांत एक काळजी वावरूं लागली.

तसे पाहिलें तर शशीचें डोकें म्हणजे काळज्याचें वारूळच होते! आकाशातला चादोबा खाली कसा पडत नाही, टेलिफोनमधून बोलणें जातें कसें, रेडिओत बसलेल्या माणसाला खायला कोण देतें आणि झोप येते कशी, वगैरे कितीतरी प्रश्न त्याला भंडावून सोडीत असत. आणि उतावीळ-पणें धावत जाऊन दुसऱ्याला हे प्रश्न विचारण्यापेक्षा आपलीं आपणच उत्तरें तो सावकाशपणें शोधून काढीत असे.

इतक्यात शशीला कसलीशी आठवण झाली. आणि पाण्यानें भरलेलें एक भाडें पुढे ठेवून तो सूर्याला नमस्कार घालूं लागला. नमस्कार घालून झाल्यावर तो भक्तिभावाने हात जोडून म्हणाला, "देवा, बाबा आज सध्याकाळीं मला सायकल घेऊन येऊं देत!" आणि मग नमस्काराचा परिणाम म्हणून आपलें पोट बाबाच्यासारखें मोठें आणि ऐटबाज झालें आहे की नाही हे तो आरशात पाहूं लागला.

लाडू खाण्याचा कार्यक्रम संपवून खाली आलेल्या शरद्ने शशीचे नमस्कार पाहिले, आणि ध्रुवाप्रमाणे ईश्वराची भक्ति करून बॅट्-बॉल्, चॉकोलेट आणि एक विमान मिळविण्याच्या आपल्या निश्चयाची त्याला आठवण झाली. पण ताबडतोब त्याच्या मनात असा धूर्त विचार आला की, नमस्कार घालून शशीला सायकल मिळते का तें आधी पाहू या, मग करूं आपण तपश्चर्येला सुरुवात.

त्याऐवजी अण्णा खाजगीवाल्याप्रमाणे तालीम करून मग शेरभर दूध पिण्याचा त्याने निश्चय केला. आणि कपडे काढून तालिमीला सुरुवात केली. सुमारें तीन-चार मिनिटें आपल्या शरीराची ओढाताण केल्यावर आपण निदान अर्धा तास तरी व्यायाम केला असावा असा त्याने कयास बाधला आणि आईकडे जाऊन तो म्हणाला, "आई, आता मला शेरभर दूध दे!"

आईचे डोळे एक आणेवाल्या भोवऱ्याएवढे झाले आणि ती म्हणाली, "एक शेर दूध? आणि तें, रे मेल्या, कशाला?"

"अग, मला अण्णा खाजगीवाल्यांप्रमाणं ताकदवान होऊन पंचपात्रीचं मुटकुळं करायचं आहे"

आई म्हणाली, "तर-तर! कालच, मेल्या, माझ्या चांदीच्या भांड्याला पोचा आणलास आता आणखी पंचपात्रीचं मुटकुळ नको व्हायला! काही नाही मिळायचें दूध चल चालता हो!"

शरद् काकुळतीला येऊन म्हणाला, "अग, पण नाहीतर माझी तालीम फुकट जाईल."

"जाऊं दे फुकट माझ्या डोक्याशी उगाच कटकट करूं नकोस!" आणि आई आपल्या कामात मग्न झाली.

वाकडें तोंड करून पाय आपटीत शरद् बाहेर आला. आपल्या जीवितातील थोर निश्चय मोठ्या माणसाच्या अडाणीपणामुळे धुळीला मिळावे ह्याची त्याला खंत वाटत होती. कपाटाखाली टाकून दिलेल्या जुन्या भोवऱ्याप्रमाणे आपण आहोत असें त्याला वाटूं लागलें. स्वस्थपणें तो कोचावर पडून राहिला

खिडकींतून कुठूनसे गाण्याचे स्वर आले 'दुनियामें कौन हमारा. ' शरद्ला वाटलें, खरेंच, कोण आहे जगात माझें? आई मारते आणि दूध देत नाही, आजी लाडवाचा डबा सोवळ्यात ठेवते, बाबा खाऊला पैसे देतात, पण शिवाजीची तलवार आणून देत नाहीत! आणि काल जिगरदोस्त दामूने बॅट्-बॉल्च्या खेळात त्याला चक्क खोटा आऊट दिला! शरद् गाऊं लागला, "दुनियामें कौन हमारा?..."

आणि आपल्या गाण्यामुळे समोरच वाचीत बसलेल्या दादाला त्रास होत आहे असें लक्षात येताच शरद्ला मौज वाटली. आणि तो आणखीनच वेडेवाकडे सूर काढून गाऊं लागला शेवटीं दादा त्याच्या अंगावर धावून आला आणि शरद् जीव घेऊन आपल्या मित्राकडे पळत सुटला.

"शरद्, अरे शरद्ऽ," आई घरातून हाका मारीत होती.

"अग, तो पळून गेलाय्" दादा पुस्तकातून डोकें वर न काढता म्हणाला.

"मग तूंच घेऊन ये बरं जरा फुलाची पुडी" आईने काम सांगितलें.

दादा गुरगुरला, "मी नाही जात." आणि त्याने पुस्तकांत अधिकच डोके खुपसलें

कुंदाच्या भातुकलीतला बाबा होऊन पोह्याचें जेवण जेवणाऱ्या शशीला दादाचें हें उत्तर ऐकून अतोनात आश्चर्य वाटलें. फुलांची पुडी आणण्यासारखी रोमाचकारी कामगिरी सोडून मळलेलीं पुस्तकें वाचीत बसण्याइतका मूर्खपणा त्याने अजून पाहिला नव्हता. दादाला ही गोष्ट समजावून सागावी असें त्याला वाटलें. पण इतक्यात त्याच्या डोक्यात एका चमकदार कल्पनेने शिटी वाजविली

धावतच तो घरात गेला आणि आईला म्हणाला, "आई, मीच आणतों फुलाची पुडी"

ह्यावर अर्थातूच आईने खूप हुज्जत घातली पण आश्चर्य असें की, शशीच्या हातात दोन पैसे देऊन शेवटी तिने त्याला पाठविलें. आणि भयाने आणि उत्सुकतेने भारावलेल्या अत करणाने शशी आपल्या महत्त्वाच्या मोहिमेवर निघाला!

जिन्याच्या अधाऱ्या कोपऱ्यात लुडबुडणाऱ्या उंदराच्या पोराने जेंव्हा त्याच्या पायाचें एकहि बोट खाल्ले नाही तेव्हा शशीला फार समाधान वाटले. पण जिना उतरून रस्त्याच्या कडेकडेने जेव्हा तो चालू लागला, तेव्हा फाटके कपडे घातलेला एक मुलगा त्याच्यामागून धावूं लागला शशी बापडा अगदी गागरून गेला. आणि त्या मुलाला म्हणाला, "बघ हं. मी माझ्या मोठ्या भावाला नाव सागेन."

पण ह्यावर तो मुलगा मोठ्याने हसला आणि त्याच्याभोवती उड्या मारूं लागला शशीला वाटलें, की हा आता गुडाप्रमाणे आपल्या पोटात चाकू खुपसणार! आणि भीतीनें कापत असताना त्याला असें आश्चर्य वाटलें, की रस्त्यातून चालणाऱ्या इतक्या लोकांपैकी कोणीच कसें आपल्याला ह्या प्राणसंकटातून सोडवीत नाही?

त्या मुलाच्या मस्तीमुळे शशीच्या हातांतले दोन पैसे खाली पडले आणि ते घेऊन तो मुलगा पळून जाऊं लागला. त्याबरोबर शशी मटकन् खाली

बसला. त्याने डोळे घट्ट मिटले आणि तो मोठ्याने किंचाळला तेव्हा मात्र एका माणसाने त्या मुलाकडून ते दोन पैसे घेऊन शशीला दिले व त्या मुलाला पिटाळून लावलें.

धडधडत्या छातीने शशी पुढे चालूं लागला वाटेंत एक भला मोठा कुत्रा आपली तांबडी जीभ बाहेर काढून शशीकडे पाहत होता. शशीने त्याच्याकडे पाहून एक भला मोठा घुटका गिळला आणि हळूहळू सरकत तो त्याच्यापलीकडे गेला. आणि मग अशी धूम ठोकली आहे म्हणता शशीने !

आणि धूम ठोकीत असताना शशीला वाटत होतें, " मी दादापेक्षा हुशार आहे. मी दादा, काका आणि बाबा ह्या तिघाहून हुशार आहे " आणि वाटेंत एक भयंकर कुत्रा आला असता त्याला चुकवून कसें पलीकडे जायचें हें आईला नाहीतर आजीला समजावून सांगावें असें त्याला वाटूं लागलें.

तो फुलवाल्याच्या दुकानाजवळ आला तेव्हा तेथे खूप गर्दी होती. तेव्हा शशी मोठ्या शिताफीने दोन लठ्ठ गुजराथी बायकांच्यामधून घुसला आणि मग फुलवाला आणि त्याची फुलें त्याच्या दृष्टिपथात आलीं

फुलवाला आपल्या कामात इतका गुंतला होता, की शशीकडे तो बघेच ना ! आणि त्या गुजराथी बाईच्या भारामुळे शशीचें नाक फुलांच्या टोपलीशीं चेंबटत होतें. शशी तिला म्हणाला, " अहो, माझं नाक चेंबटतं आहे. "

पण त्याचें बोलणें तिला ऐकूं गेलें नाही आणि ती फुलवाल्याशीं अधिकच मोठ्याने भांडूं लागली. शेवटीं कंटाळून शशी फुलवाल्याला म्हणाला, " अहो फुलवाले, मला द्या ना फुल. लोकांनाच काय सगळीं देऊन टाकता ? "

फुलवाला म्हणाला, " हा-हा, देतों. आण बरं तुझे पैसे इकडे. "

पण ' आधी फुलं घे आणि मग पैसे दे ' असें आईने सांगितलेलें शशीला पक्कें आठवत होतें. म्हणून तो फुलवाल्याला म्हणाला, " वा-वा ! आम्ही काय म्हणून आधी पैसे देऊं ? तुम्हींच द्या आधी फुलं. "

त्याचें हें बोलणें ऐकून आजुबाजूचीं सारीं माणसें हसूं लागलीं. आणि आपली काही चूक नसताना हे लोक आपल्याला का हसतात म्हणून शशी त्याच्याकडे रागाने पाहूं लागला...अगदी बाबा चष्म्यावरून पाहतात तसें!

आता शशीला थाबायचा कंटाळा आला त्याला वाटलें, आपण आता मोठ्या रस्त्यावर जावे. तेथे खूप फुगे घेऊन फुगेवाला फिरत असेल, आईच्या मोठ्या ट्रंकेसारखी दिसणारी बस पळत असेल, पोलीस शिपाई रस्त्याच्यामध्येच वाकडेतिकडे हात करून उभा असेल आणि डोक्यावर एक लाबलचक काठी घेऊन फिरणाऱ्या ट्रॅमला माणसें लोंबकळत असतील. आपण तसेंच बेदरकारपणे लोंबकळत जावे, आणि जाता-जाता एखाद्या पाश्याची थबकडी टोपी उचलावी अशी शशीची महत्त्वाकाक्षा नव्हती काय?

भीतीने आणि उत्सुकतेने भारावलेल्या मनाने शशी त्या मोठ्या रस्त्यावर गेला आणि मोठ्या रस्त्याचें ते सारें वैभव त्याने श्वास आवरून पाहिलें

आणि एका खाबाजवळ जेव्हा बरींच मोठीं माणसें एकामागे एक उभी राहून झुग्‌झुग् आगगाडी खेळताना त्याने पाहिलीं तेव्हा तर त्याला हसूंच आवरेना! त्याला वाटलें, की बाबा ऑफिसमध्ये जाऊन काम करतात असें म्हणतात तें खोटें! ते असेच रस्त्यात झुग्-झुग् आगगाडी खेळायला जात असले पाहिजेत!

आणि तितक्यात रस्त्याच्या पलीकडल्या बाजूला जेव्हा शरद् आपल्या मित्राच्याबरोबर फिरताना दिसला तेव्हा तर त्याच्या आनंदाला पारावारच राहिला नाही!

"शरद्, शरद्..." असें ओरडत तो थेट रस्त्याच्यापलीकडे धावत गेला आणि शरद्‌ला भेटला. अर्थात् ह्या भानगडींत मोटारीने कर्कशपणें ब्रेक लावले, पोलिस शिपाई मोठ्याने ओरडला आणि लोकानी खूप शिव्या दिल्या हें खरें, पण शशीला ते ऐकूंच आलें नाही! आणि ऐकूं आलें असतें तरी शशीला त्याची काय पर्वा होती? शरद्‌चें बोट धरून तो ऐटींत चालूं लागला.

शरद्च्या ज्या धाडसी जीवनाच्या कथा त्याने ऐकल्या होत्या ते तो आता अनुभवणार होता आणि शरद्विषयी त्याला नितांत आदर होता त्याला डोक्यावर उभे राहता येत होते, पतंग उडवता येत होता, भल्यामोठ्या बांबूच्या काठीने लोकांचे पतंग पकडता येत होते आणि म्हणे तो ट्रमवाल्याला 'बनवीत' असे! जीवनात ह्याहून श्रेष्ठ असा पुरुषार्थ तो काय?

त्या उन्मादाच्या भरात रस्त्यात उभ्या असलेल्या गायीची शेपटी त्याने बेदरकारपणें ओढली आणि त्या गायीने जेव्हा शिंगें हालवली, तेव्हा शरद्चा हात घट्ट पकडून तो मोठ्याने हसला आणि ओरडून शरद्ला म्हणाला, "अरे शरद्, मी गायीची शेपटी ओढली"

पण शरद्ने त्याच्याकडे दुर्लक्ष केलें तो आपल्या मित्राला जोराने विचारीत होता, "दत्ताजी शिंदे जखमी झाल्यावर त्याच्या पायाजवळ उभं राहून नजीबखानानं जेव्हा त्याला चिडवलं, तेव्हा दत्ताजीनं त्याला कैची घालून पाडलं का नाही?"

शरद्चा मित्र म्हणाला, "अरे, त्याचे पाय पुरले नसतील कैची घालायला."

त्यावर शरद् जोरात म्हणाला, "छे रे, नजीबखान अगदी त्याच्या पायाजवळ उभा होता आपल्या पुस्तकाच्या चित्रातच दाखवलं आहे ना तसं"

आपल्या धाडसी कृत्याचें शरद्ने कौतुक करूं नये ह्याचे शशीला वैषम्य वाटलें पण तें क्षणभरच 'नजीबखान', 'कैची', 'दत्ताजी' असल्या अद्भुत शब्दांच्या जगात वावरणाऱ्या शरद्ला आपली कृति क.पदार्थच वाटणार हें त्या समजूतदार मुलाला पटलें

इतक्यात शरद् ओरडला, "अरे शशी, धाव, धाव!" तशी मागचापुढचा विचार न करता शशी फरफटत ठेचाळत शरद्च्याबरोबर धावूं लागला ह्या धाडसी जीवनात भाग घ्यायला मीदेखील समर्थ आहे हें त्याला सिद्ध करायचें होतें ना!

आणि पाहता-पाहता ते सगळे त्या लोंबकळणाऱ्या माणसांच्या ट्रममध्ये शिरले, शशी तर त्या भानगडींत एका माणसाच्या धोतरात

इतका गुरफटला, की त्याला काहीच दिसेना ! पण म्हणून तो अणुमात्र घाबरला नाही अगर ओरडला नाही

रस्त्यातले लोक म्हणाले, ‘ अरे, पडाल, पडाल ! काय बेताल कार्टी आहेत ! ”

पण इतक्यात ट्राम सुरू झाली. आणि शरद् व त्याचे मित्र विजयोन्मादाने ओरडले, “ हो होऽहोऽऽ ’ आणि त्या धोतराच्या गुंतावळ्यातून बाहेर येत शशीनेदेखील त्याना साथ दिली–त्याला कांहीच दिसत नव्हतें तरी !

आनंदाच्या प्रचंड लाटेबरोबर तो खूप उंच उचलला गेला होता, अगदी गुदमरून गेला होता त्याला आता कशाची पर्वा नव्हती, भीति नव्हती. तोंडात सिगरेट भरून ‘ फॅस्-फॅस् ’ करणारे आपण साहेब आहोंत असें त्याला वाटत होतें.

आणि फुलाची पुडी आणायला बाहेर पडायचें सोडून पुस्तक वाचणाऱ्या दादाची त्याला विलक्षण कींव वाटत होती !

# गिचमिड

पंचावन वर्षांचे कुळकर्णी ऑफिसात नवीनच लागलेल्या तरुण पोराशी मिळून-मिसळून गप्पा मारण्याचा केविलवाणा प्रयत्न करीत होते. कारण आता त्याची तिसरी मुलगी कमू लग्नाला झाली होती तिच्या खालचे आणखी तीन नंबर होतेच !

अठ्ठावीस वर्षांच्या मिस् वाघोलीकर बेरड सबनीसाच्या पुढे-पुढे करून हसत होत्या त्याला चार पोरें आहेत हे त्याना माहीत नव्हतें थोडेंच ? पण तरी त्याच्याशीं बोलताना त्या आता आपल्याला न शोभणारे लडिवाळ हावभाव करीत होत्या.

सिगरेट् फुकत डिस्पॅच्-क्लार्क् डिसोझा निर्विकारपणें जोशाना म्हणाला, "पाच रुपये देता का ? बायको फार आजारी आहे" जोशी पाकीट चाचपीत म्हणाले, "काय करणार बुवा ! पैसेच नाहीत आज खिशात." आणि निर्लज्ज डिसोझा जरादेखील वरमला नाही

अकाउंटट देशपांडे साऱ्या जगाकडे संशयाने आणि शत्रुत्वाने पाहत अबोलपणें सावकाश जिना उतरले पैशाच्या व्यवहारावर वीस वर्षे डोळ्यात तेल घालून नजर ठेवल्यामुळे त्याची वृत्ति अशी झाली होती. मात्र त्याना वाटत होतें की आपण आता फार धूर्त झालो आहोत !

लांबोडक्या डोक्याचा खटपट्या पंडित कुठूनतरी स्वस्तात मिळविलेलें चागलें कापड खाकोटीला मारून लगबगीने चालला होता. संध्याकाळचें वर्तमानपत्र फुकटात कसें वाचता येईल ह्याच विवंचनेंत तो बहुधा असावा.

एक नटवी आया आपल्याला संभाळायला दिलेल्या मुलाला बदडीत होती. आणि आपल्या मुलाला पाजणाऱ्या भिकारणीच्या उघड्या स्तनाकडे सगळ्या लोकांच्या नजरा वळत होत्या.

थिएटरच्या दाराशीं दोन चार धंदेवाईक बाया आपण कोणाचीतरी वाट पाहत आहोत असा बहाणा करीत उभ्या होत्या. आणि एक सुंदर कम्युनिस्ट तरुणी उन्हातान्हाची आणि लोकाच्या टवाळीची पर्वा न करता चिकाटीने 'लोकयुगा चे अंक विकीत होती.

त्या माणसाच्या प्रचंड गर्दीत प्रत्येक मनुष्य एकाकी होता कोणाचें मन कोणालाच समजत नव्हते आणि आपलें मन स्वत ला समजतें असा सगळ्याचाच गैरसमज होता त्या गर्दीत केशवला विलक्षण एकाकी आणि गुदमरल्यासारखें वाटू लागलें, आणि रहदारीच्या गिचमिडीतून बाहेर पडून आपण केव्हा एकदा रेक्लमेशनच्या रस्त्याला लागतो असें त्याला होऊन गेलें

रेक्लमेशनच्या रस्त्याला तो लागला तरी आपले पाय गळल्यासारखे त्याला वाटत होते. शरीर अगदी हलके झालें होतें आणि घशाशीं काहीतरी खवखवत होतें.

पश्चिमेला रक्ताने माखलेला मासाचा लोळागोळा ढगाच्या पोतडींत बाधून समुद्रात बुडविला जात होता. त्याच्या रक्ताचीं थारोळीं आकाशांत जागोजाग साठलीं होतीं आणि त्याच्या शिडकावाने माखलेल्या लाटा वेडपटपणाने हिदकळत होत्या

ते दृश्य पाहून क्षितिजाने डोळे मिटून घेतले. रेक्लमेशनच्या सिमेंट-कॉंक्रिटच्या कठड्याने पाढरेंफटफटीत हास्य केलें, आणि पलीकडच्या बाजूच्या थडग्यासारख्या दिसणाऱ्या चौकोनी इमारतींच्या रागातून दिवे लागून भुताची मेजवानी सुरू झाली त्याच्या नाचगाण्याचे कर्कश स्वर ऐकण्याकरिता अधार डोळे मिचमिचावीत आणि चाचपडत पुढे येऊं लागला. आणि रस्त्यावरच्या दिव्याच्या फिक्कट पिवळ्या रागेने एक लाबलचक खुळें हास्य केलें

केशवने एक छोटेसें हास्य केले आणि उलगडत जाणारें कल्पनांचें भेंडोळें मध्येंच तोडून टाकण्याचा त्याने प्रयत्न केला. आपलें बाह्य जीवित आणि मनात वावरणारी ही भुताखेताची सृष्टि ह्याचा परस्परसंबंध काय तें त्याला कळेना.

बंदरात सुरक्षितपणें नागरून पडलेल्या होडक्यासारखें त्याचे बाह्य जीवित होतें. काळज्या आणि दु.खें ह्याची तेथे फारशी दाटीवाटी झाली नव्हती, आणि होण्याची शक्यताहि नव्हती कारण दुबळ्या पाढरपेशा जगातला हा माणूस ससारदक्ष होता, सरळमार्गी होता, आणि भित्राहि होता. जुगार, व्यभिचार, व्यापार, राजकारण आणि सप ह्या पापाच्या पंचकडीपासून तो अगदी अलिप्त होता पाढरपेशा परपरेच्या पोलादी चौकटींत त्याचें जीवित कायमचे बंदिस्त करून टाकण्यात आलें होतें

आणि तरी त्याच्या मन पटलावर जाणिवेच्या पेन्सिलीच्या तुकड्याने कंटाळवाण्या विचाराच्या रेघोट्याची गिचमिड सारखी निर्माण होत होती. वेड्यावाकड्या चेहेऱ्याचीं अनेक प्रश्नचिह्ने त्याच्या मनात सारखी उभी राहत होतीं कोणाचे ओगळ, कोणाचे भेसूर, आणि कोणाचे निद्रिस्त मुलाच्या चेहेऱ्यासारखे निष्पाप असत हे प्रश्न त्याला सारखे ढोसकत आणि डिवचत असत. आणि मग कुरकुरत, कंटाळत त्याचे मन ह्या प्रश्नाची उत्तरे शोधूं लागायचें. आपल्याभोवती पसरलेल्या वस्तूंच्या, व्यक्तीच्या आणि घटनाच्या अफाट गुंतागुंतीचें एका बाजूचें टोक शोधून काढण्याचा अर्धवट मित्रा यत्न तो करायचा. हें गतिमान् जीवित चाललें आहे तरी कोठे, तें आपल्या दुबळ्या दृष्टीने पाहूं लागायचा. आणि कंटाळवाण्या विचाराची गिचमिड परत मनात सुरू व्हायची. त्या पेन्सिलीच्या खरखरीने त्याच्या अंगावर शहाऱ्यांच्या लहरीच्या लहरी उसळायच्या

तारुण्याच्या पहिल्या उमेदींत त्याला असें वाटायचें की आकाश भेदून आपण ह्या प्रश्नाचें उत्तर घेऊन येऊं. जीविताची अतिम ओढ काय आहे तें समजावून घेऊं आणि ह्या त्रस्त जगावर शाततेचें सिंचन करूं.

पण आता तो उत्साह मावळला होता आपल्या बुद्धीची आणि कल्पनेची शिदोरी किती तुटपुंजी आहे हें त्याला समजलें होतें. आणि तरी त्याचें मन रडत-खुरडत हा प्रवास करीत होतें. यश मिळेल म्हणून नव्हे, तर ही मूलभूत भूक दडपून टाकण्याच्या पद्धतशीर प्रयत्नात तो इतराइतका यशस्वी झाला नव्हता म्हणून.

. गार वाऱ्याच्या झुळकाच्या झुळका आता येऊं लागल्या होत्या. आणि समोरून एक सुंदर तरुणी नेटकी पावलें टाकीत येत होती. तिच्या नाजुक गौर वर्णावर मोत्याची काति होती अगावरून फिक्कट रेशमी वस्त्र ओघळत होते आणि काळाभोर मखमली केशकलाप अधाराला खुलवीत होता.

ते सौंदर्य पाहून आपल्या मनातील आर्तता निमाल्यासारखे केशवला वाटले असीम शाततेच्या शीतल जलाशयात आपलें तप्त शरीर बुडवलें गेलें आहे असें त्याला वाटलें

आता रात्र झाली होती सारे विश्व व्यापून अधार समाधिस्थ झाला होता त्याच्या मस्तकावर धवल पुष्पाचा मुकुट होता आणि विद्युत्दीपानी उजळलेली मुंबई अधाराच्या बोटातल्या आंगठीसारखी तळपत होती सागर विश्वाचें अगाई-गीत कातर आवाजात म्हणत होता.

शात–निश्चल–अनंत–आनंदमय असें सारें होते आणि त्या दृश्यांतून गाधीजींचे शब्द आपल्याला ऐकू येत आहेत, असें त्याला वाटलें,
" My ambition is to wipe every tear from every eye. "

क्षणभरच हा आभास टिकला. आणि मग वाऱ्याने पाचोळा उडून जावा तसें हे सारें दृश्य उडून गेले परत तो रहदारीच्या रस्त्याला लागला होता.

भगभगणारे दिवे, विजेच्या तारांचीं जाळकर्टे, विद्रूप जाहिराती, आणि रोरावणाऱ्या ट्राम्बा! जणू आधळया मानवी प्रवृत्तीच आपल्या नेमलेल्या मार्गाने अगतिकपणें आणि अट्टाहासाने चालल्या होत्या विद्युत्-प्रकाशात माणसें चिध्याच्या भावल्यासारखीं निर्जीव वाटत होतीं. एकाकी, करुणास्पद, हास्यापद अशीं तीं सारीं होती जो-तो आपल्याच जाणिवेच्या कोशात गुरफटून जगात आधळेपणाने वावरत होता. जगात इतर माणसें, प्रवृत्ती, वगैरे आहेत ह्याची कोणालाच जाणीव नव्हती. आणि ती दु खद जाणीव परिस्थितीने करून दिली म्हणजे मात्र प्रत्येकजण दु:खित आणि आश्चर्य-चकित होऊन सुस्कारे सोडत होता, आणि चरफडत होता. हीं वेडीं माणसें जगाच्या वेडेपणाला नावें ठेवत होतीं.

त्याला वाटलें की, आकाशातून कोणीतरी चेतनेच्या चिरटोळ्या फाडून अवकाशात भिरकावून दिल्या होत्या. त्यातल्या ज्या पृथ्वीवर आल्या होत्या त्याचीं माणसें झालीं होतीं. आणि आता ह्या चिरटोळ्याचा मेळ बसवता येत नव्हता.

ह्या कल्पनांची आणि दृश्याची केशवला उबग आली त्याचें डोकें खूप दुखू लागलें. त्याने वर पाहिलें तो एखाद्या उनाड मुलाने गटारात डोकावून पाहावें त्याप्रमाणे फिक्कट चंद्र इमारतीच्या आडून त्या रस्त्यात डोकावून पाहत होता.

तो घरीं आला तेव्हा त्याची बायको उत्साहाने पुढे आली तिने हसत-हसत त्याचा कोट हातात घेतला आणि सरबताचा ग्लास त्याच्या हातात दिला. मग उत्साहाने ती त्याच्याशीं बोलूं लागली. त्याचा नेहेमीचा कोळसेवाला त्याना कसा फसवीत होता तें तिने कसें हुडकून काढले होतें, आणि त्यामुळे आता महिन्याकाठीं एक रुपया कसा वाचणार होता हें तिने तपशीलवार सांगितलें. आणि तिच्या उत्साहात सहभागी होण्याचा अयशस्वी प्रयत्न करता-करता त्याचें मन तिच्याविषयीच्या प्रेमाने ओलावलें, व्याकुळ झालें

तितक्यात कोपऱ्यातून हाक आली, " केशव, अरे केशव–"

त्याची पाउणशें वर्षांची म्हातारी, आंधळी आजी त्याला कातर आवाजात हाक मारीत होती.

तो तिच्याजवळ गेला आणि बायकोला सांगून त्याने तिच्या हातात एक सरबताचा ग्लास दिला.

तिने आपल्या दंतहीन तोंडाने ते सरबत मचामचा पिऊन टाकलें व त्या सरबताचा एक थेंब ओघळून तिच्या हनुवटीवर थरथरत थांबला. मग पंचवीस वर्षांपूर्वी कोकणात मरून गेलेल्या साळीच्या मुलाने आपल्या संसाराची वाताहात कशी केली आणि आता त्याची मुलगी लग्नाला कशी झाली आहे ह्याबाबत एक लांबच लांब चऱ्हाट तिने वळलें आणि मग भीत-भीत आपली इच्छा कवडीमोल आहे ह्या जाणिवेने तिने केशवला म्हटलें, " तूं त्या मुलीच्या लग्नाची काहींतरी खटपट कर. "

आणि हें सारें बोलताना तिच्या हनुवटीवरचा थेंब थरथरत होता.

का कोण जाणे, पण त्या थेंबाकडे पाहून केशवचें हृदय पिळवटून आलें आणि तिच्या बोलण्याचे त्याला विलक्षण आश्चर्य वाटलें. माणसाच्या इच्छा-आकांक्षा कुठे दूरवर अडकलेल्या असतात तें लक्षात येऊन तो भाबावला.

इतक्यात केशवची बायको म्हणाली, "किती मेलें तें बोलायचे? माणसाला जरा स्वस्थपणा तरी हवा का नको? आणि आता दुसऱ्यांचीं लग्नें जमवायचे तेवढे बाकी राहिलें आहे"

आजी बिचारी गप्प बसली केशवने मात्र बायकोकडे आश्चर्याने पाहिलें आपल्यावर प्रेमाचा वर्षाव करणारी ती हीच का व्यक्ति असा त्याला प्रश्न पडला

तो तसाच तेथे बसून राहिला. बऱ्याच पावलाची ये-जा झाल्यामुळे त्याच्या आजीला वाटलें की, तो निघून गेला असावा आणि तिच्या दृष्टिहीन नेत्रातून एकच अश्रु ओघळला. तो अश्रु, तो सरबताचा थेंब पाहून केशवला एकदम भडभडून आलें, आणि त्याला वाटलें की आजीच्या कंबरेला मिठी मारून तिच्या मांडीत डोकें खुपसावे लहानपणी तिने दहींभात भरवल्यावर तो कधी-कधी उष्ट्या तोंडानेच करीत असे ना तसे!

पण त्याने तसे काहीच केलें नाही. बाहेर येऊन तो आरामखुर्चीवर बसला. त्याचे डोकें सडकून दुखत होते आणि शरीर विकल झालें होतें.

त्याचा धाकटा मुलगा मोठ्या उत्साहाने आणि चिकाटीने आपल्या पुस्तकातला कठीण धडा वाचत होता

"चिमा अंधार पडला दिवा...दामोदर, पाटावर बैस. ही घे तुला ताजी पुरी ..आई, मला साखर पण हवी..."

आणि साखरेचें नाव येताच तो खुदकन् हसला.

केशव विमनस्कपणें त्याच्याकडे पाहत होता. उजेड, अंधार, दिवा, पाट, पुरी, साखर...त्याच्या जाणिवेच्या पोतडींतील साऱ्याच वस्तू इतक्या साध्या आणि स्पष्ट होत्या. निदान केशवला तसें वाटलें, आणि जोडाक्षरांच्या

अडथळयातून मार्ग काढायला मदत करणारा सर्वज्ञ प्राणी एवढीच कदाचित् केशवची त्याच्या जगात किंमत असेल.

आपला मुलगा, बायको, आजी ह्या सर्वांच्या अंतर्विश्वाची रचना आपल्या मनात करण्याचा खुळा प्रयत्न तो करूं लागला आणि त्याला जास्त-जास्त पटूं लागलें की, ही सारीं माणसें आपल्याला अगदी परकीं आहेत ह्याना आणि आपल्याला एकत्र बाधणारे पाश अगदी क्षुल्लक आणि दुबळे आहेत. सारीच माणसें ह्या जगात एकाकीपणाने जगत असतात. गैरसमज आणि अज्ञान याच्या पटलातच जगाचा सारा व्यवहार अखेरपर्यंत चालायचा आहे. आणि त्याला आश्चर्य वाटूं लागलें की ही समाजरचना इतका दीर्घकाल टिकली कशी ? ती कोलमडून का पडत नाही ?

ह्या आश्चर्यातिरेकातच त्याने स्वतःच्या अन्तर्विश्वाची पाहणी करण्याचा यत्न केला.

...अडगळीने भरलेलीं, अंधारलेलीं अशीं केवढींतरी मोठाली उदास दालनें तेथे होतीं, अज्ञात, कोंदट बोळकंड्या होत्या, आणि काही टुमदार हसऱ्या खोल्या होत्या सापळयात सापडल्यामुळे संतापून येरझारा घालणारा आणि सापळयाच्या गजावर फाडकन् पंजे मारणारा उग्र, संतप्त वाघ तेथे होता, आणि चोच पंखात खुपसून झोपी गेलेला राजहंस होता कुबट वासनाचा तेथे दुर्गंध होता, आणि तोंडे वेडींवाकडीं करून मजेने हसणारा एक विदूषक होता. आणि अगदी अस्पष्ट पण मधुर असा एक गायिकेचा आवाज येत होता, 'मंजुळ रव भरला वनातरीं ' आणि एक म्हातारा खोकत-खोकत म्हणत होता, "तरी मी सागत होतों "

छे, छे, त्या अंतर्विश्वाच्या मर्यादा, त्यांतील गोष्टी आणि त्यांची संगति ह्यांविषयीं काहीच बोध होणें शक्य नव्हतें. जाणिवेची इवलीशी मिणमिणती पणती घेऊन त्या अन्तर्विश्वात खुडबुडणारी स्वतःची केविलवाणी मूर्ति पाहून त्याला खिन्नपणें हसूं आलें.

टेबलावर पडलेली काडेपेटी त्याने उचलली, त्यांतली एक काडी पेटवली आणि मग फुंकर मारून विझवून टाकली.

.. आणि त्याची बायको त्याच्या कपाळावर आपला थंड, मृदु हात टेकून म्हणत होती, "ताप आलाय् तुम्हाला आज..."

त्याच्या मनातील खळबळीचा बाह्य जगावर एवढाच काय तो ठसा उमटला होता.

# चोरटीं पाउलें

कुमुद ' टाइम्स्'चें ' कठीण पान ' वाचत होती.

मास्तरनी सांगितलें होतें की, 'टाइम्स् ' वाचला म्हणजे इंग्लिश सुधारतें आणि कुमुदचें ' किनई ' इंग्लिश कच्चें होतें एक कठीण शब्द ती स्वत.शीच पुन्हा-पुन्हा पुटपुटत होती इतर अनेक मुलांप्रमाणे तिच्या दृष्टीने ही समजण्याची क्रिया होती.

इतक्यात 'टाइम्स्'च्यापलीकडून एक कागदाची गोळी आली आणि कुमुदच्या तोंडावर पडली कुमुदने दचकून ' टाइम्स् ' बाजूला केला समोर शेजारचे वसतराव भिवया चढवून विनोदी मुद्रा करून उभे होते वसतरावाची विनोदी मुद्रा सिनेमातल्या खलनायकाच्या मुद्रेसारखी दिसत असे बहुधा त्याच्या जाड भुवयाचा आणि राकट ओठाचा तो परिणाम असावा

कुमुदचा चेहरा दृष्टीस पडताच वसतरावदेखील दचकले पण कुमुदच्या तें ध्यानात आलें नाही ती भाबावली अशा वेळी पुरुषाशी काहीतरी गमतीदार बोलायचें असते हे स्वभावत च तिच्या ध्यानात आलें. पण कुमुदला गमतीदार बोलणें कधी सुचतच नसे.

तेवढ्यात वसतराव नाटकीपणाने म्हणाले, " हॅल्लो, कुमुदबेन ! काय चाललंय ? "

कुमुद म्हणाली, " 'टाइम्स्' वाचतेंय. कित्ती कठीण शब्द असतात हो ह्या 'टाइम्स्'मधले! सांगा गडे ह्या शब्दाचा मला अर्थ " आपल्या बोलण्यातल्या ' गमतीदारपणाचा ' अभाव भरून काढण्याकरिता कुमुदने लाडिक उच्चार केले आणि माना वेळावल्या.

पण वसतरावावर त्याचा परिणाम झाला नसावा. कारण त्यानी कुमुदला काहीतरी मोडकेंतोडकें उत्तर दिलें. आणि ते अधीरतेने इकडे-

तिकडे पाहूं लागले कुमुदचा उत्साह एकदम ओसरला. तिच्या काळ्यामेळ्या साध्याभोळ्या चेहेऱ्यावर ते जसेंच्या तसें दिसून आलें.

इतक्यात कुमुदची मोठी बहीण सिंधु खोलींत आली. उंच, गोरी, देखणी, तल्लख अशी ती होती. वसतरावाकडे तिने पाहिलें नसावे असें पहिल्याने कुमुदला वाटलें. पण सिधूने जेव्हा आरशापुढे उभें राहून एक सुरेखशी गिरकी घेतली, तेव्हा कुमुदच्या ध्यानात आलें की तिने वसतरावाना पाहिलें असावे

सिंधु येताच वसंतरावाचें सारें लक्ष एकाग्र झालें. तिने ती गिरकी घेताच त्याना उगीचच केसातून हात फिरवावा लागला आणि दुसरीकडे पाहावे लागलें–आणि मग एकदम कुमुदच्या ध्यानात आलें की, मघाशी वसंतरावानी आपल्याकडे कागदाचा बोळा फेकला तो आपल्याला सिंधु समजून. आपला असा अपमान झाला आहे असें ध्यानात येताच आपण ताडकन् तेथून उठून जावें असे कुमुदला वाटलें, पण ती सिंधु आणि वसंतरावाकडे पाहत तशीच बसून राहिली

"आज मॅच्‌ला फार मजा येणारसं दिसतंय." वसंतराव वर्तमान-पत्र चाळीत म्हणाले.

"शी बाई ! कंटाळा आला मला त्या मॅच्‌चा." सिंधु तुसडेपणाने म्हणाली.

"मी बुवा आज सी सी.आय् वर जाणार आहे, आणि संध्याकाळीं झक्क डिनर करून परत येणार आहे. तू येणार का ग, कुमुद ?" वसंतरावानी हसून विचारलें.

"खरेंच, कुमुदलाच घेऊन जा तुम्हीं, वसंतराव." सिंधु एक भिवई चढवून गंभीरपणें म्हणाली.

ही एक भिवई चढवायची लकब अलीकडे सिंधूने नवीनच उचलली होती ती कुठल्या नटीपासून उचलली असावी ह्याचा विचार कुमुद करूं लागली सिंधूने असल्या लकबी उचलल्या म्हणजे त्यांचा पहिला प्रयोग बहुधा कुमुदवर होत असे.

सिंधूचें बोलणें ऐकून वसंतराव फारच मोठ्याने हसले आणि मग आपल्या इच्छेविरुद्ध सिंधूदेखिल बारीकसें हसली त्या दुष्ट हास्यामुळे तिचा चेहेरा अधिकच गोड दिसूं लागला.

"मला जायचं असल तर जाईन मी एकटीच मला नको कोणी न्यायला." कुमुद फणकाऱ्याने म्हणाली, आणि ताड्दिशी उठून निघून गेली. चिडक्या विचाराचा एक उंच डोलारा तिच्या मनात उभा राहिला, आणि असहायतेमुळे कोलमडून पडला.

"मग दहाला तयार राहा ह." वसंतराव खाजगी आवाजात म्हणाले

"म्हणजे मी येणार असं वाटलं कीं काय तुम्हाला?" सिंधु निर्विकारपणें आरशात पाहत म्हणाली खालचा ओठ किंचित् पुढे काढून आपल्या चेहेऱ्यात किती लाडिकपणा येतो तें ती अजमावून पाहत होती.

"पण..." वसंतराव पुढे सरकत अजीजीने म्हणाले.

"अंहं, आज मैत्रिणीबरोबर जायचंय मला." सिंधूने आपल्या पदराचें टोक डाव्या खाद्यावर टाकलें

त्यासरशी वसंतराव एकदम म्हणाले, "तुला आलंच पाहिजे" आणि तिचा हात पकडण्याचा त्यानी प्रयत्न केला.

सिंधूने चपळतेने दूर होत हाक मारली, "आई–"

विमलाबाई शेजारच्या खोलीतून येत म्हणाल्या, "काय ग?" मग वसंतरावाकडे लक्ष जाऊन त्या म्हणाल्या, "आज वसतरावाबरोबर म्याचूला जाणार आहेस वाटतं?" 'म्याच्' असा आपण इंग्रजी शब्दाचा फार सुंदर उच्चार केला असें त्याना वाटत होतें.

सिंधु म्हणाली, "नाही बाई. वसंतरावाची आली आहे आता परीक्षा जवळ. नाहीतर परत एम्. बी. बी. एस्. ला नापास व्हावयाचे ते.' हसूं आलें म्हणून ती रुमालाचें टोक कुरतडायला लागली.

"हो बाई. मिळूं द्या, वसंतराव, तुम्हाला एकदा ती डेग्री" 'डेग्री' हा शब्द वापरायला सापडावा एवढ्याच हेतूने विमलाबाई म्हणाल्या.

वसंतराव तोंड भरून हसले आणि निघून गेले.

" माझ्या झंपरचे हात शिंप्याने जरा लांब केले आहेत का ग ? " विमलाबाई सिंधूच्याशेजारी उभ्या राहून आरशात पाहत म्हणाल्या.

" नाही बाई " विमलाबाईंच्या लठ्ठ दंडाशेजारच्या आपल्या नाजुक दंडाकडे अभिमानाने पाहत सिंधु म्हणाली.

" नाही कसे ? आखूडच हवे होते ते जरा " विमलाबाई आपलें रूप पाहण्यात गर्क झाल्या होत्या.

" ह्या वयात आता तुला हें शोभत नाही." हें आपल्या आईला कसें सांगावे तें सिंधूला समजेना.

कारण आपले तारुण्य आता संपलें हें लक्षात घ्यायला विमलाबाई तयार नव्हत्या त्या तिरपी केशरचना करीत रिस्ट्‌वॉच् लावून आणि पर्स् हातात घेऊन बाहेर पडत असत आपल्या लठ्ठ शरीराच्या चपळाईने हाल-चाली करीत लाडिक आवाजात बोलत आणि खूप हसत आणि खूप पैसे मिळविण्याच्या श्रमामुळे लवकरच म्हाताऱ्या दिसू लागलेल्या आपल्या नवऱ्याशीं अतिशय तुसडेपणाने वागत आणि गमत अशी की, ह्या तुसडे-पणाच्या वागणुकीमुळेच त्या आपल्या यजमानाना अधिक आवडत असत.

टेबलाच्या कोपऱ्यावर रेलून उभ्या राहत विमलाबाई म्हणाल्या,"खरच गडे, सिंधू , मी आज तुझं ते तांबड्या-पिवळ्या ठिपक्याचं पातळ नेसणार आहे."

" बरी आठवण झाली बाई माझं ते मेलं पातळ कुठे दिसतच नाही आहे दोन दिवस शंकर, अरे शंकरऽ–"

" काय, ताईसाहेब ? " मानेला एक झटका देऊन आपल्या झिंज्या आवरीत शंकर म्हणाला.

" माझं ठिपक्याचं पातळ कुठे ठेवलं आहेस, रे ? "

" त्ये व्हय् ? ते ठेवलय त्या ट्रंकेत नीट गुंडाळी करून. "

" का तिथे ठेवलंस ? हज्जार वेळा मी तुला सांगितलं आहे कीं माझे सगळे कपडे तूं ह्या कपाटात ठेवत जा म्हणून. मूर्ख कुठचा ! कध्धी एक काम नीट करील तर शपथ ! हसूं नको आणखी दात विचकून. जा, तें पातळ इकडे घेऊन ये " सिंधु आपल्या साऱ्या लकबी विसरून ओरडली.

शंकर मुकाट्याने तें पातळ घेऊन आला आणि म्हणाला, "आता मला काय ठावूक? मिनी आपलं ठेवलं ते थत माज्या ध्यानामदीच रहात नाय्..." आणि असेंच तो वायफळ बोलत राहिला. आपल्या लक्षात गोष्टी नीटशा राहत नाहीत हे शंकरला मोठे आढ्यतेचें लक्षण वाटत असे आणि तो जेव्हा वायफळ बोलत असे तेव्हा तो आपल्या मते खूप बोलणाऱ्या आणि हसणाऱ्या आपल्या मालक लोकाचें अनुकरण करीत असे सिंधूने सागितलेलीं कामें करताना चुका करण्यात त्याला मौज वाटायची आणि तिचे ओरडणें मुकाट्याने ऐकून घेऊन तो नुसता हसायचा इतराशी मात्र तो उर्मटपणें वागायचा.

"कुठें जायचंय्, ग, तुला आज?" सिंधूने विचारले

"अग, त्या रमाबाई फार दिवस आग्रह करून बोलावताहेत चहाला. आपण अगदीं मागें चाळीत रहायचो ना, तिथे रहायच्या त्या. अजून तिथेच बिऱ्हाड आहे त्याचं. कश्शी बाई हीं माणस वर्षानुवर्षे त्या घाणेरड्या चाळींतून रहातात कोण जाणे!" नेहमीप्रमाणे फाजील हावभाव करीत विमलाबाई म्हणाल्या.

"मग कशाला जातेस तूं त्याच्याकडे? अगदीं बावळट माणसं आहेत तीं."

"खरं बाई. पण अशा गरीब माणसाकडे अधूनमधून गेलं म्हणजे बरं वाटतं हो त्याना. त्याच्या दारात तरी नाहीतर कधीं मोटार उभी रहायची आहे?"

"रमाबाईंच्या त्या कमळीच लग्न झालंय् ना, ग? ती काल रस्त्यात आम्हांला भेटली होती. नवऱ्याबरोबर फिरायला जात होती."

"हो का? हु हु हु" विमलाबाई अकारण फॅशनेबल हसल्या.

"अगदीं काळूबाईसारखी दिसते आणि बोलते आणि तिचा नवरा म्हणजे ध्यानच आहे नुसतं." सिंधूला खुदकन् हसूं आलें.

"इतका का वाईट आहे?"

"इश्श! अग, टक्कल आहे मुळीं सगळं त्याला. आम्हीं म्हटलंसुद्धा

कमलला की, 'तुझ्या नवऱ्याला हॅट घ्यायला सांग एक.' पण त्या बावळटाला आमच्या बोलण्यातली खोच समजलीच नाही. ती म्हणाली, 'आहेत की ह्याच्या चागल्या दोन हॅट्स्, पण आज घातली नाही त्यानी.'"

विमलाबाई मान वलती करून खूप मोठ्याने हसल्या आणि आईने आपले असें बेढब अनुकरण केलेलें पाहून सिंधूने वाईट तोंड केलें. सिंधूच्या मैत्रिणीचा घोळका हसला की सगळे लोक त्याच्याकडे वेड्यासारखें पाहत राहत.

तितक्यात नानासाहेब तेथे आले ते म्हणाले, "मायलेकींची काय खलबतं चालली आहेत बुवा? आमच्या पाकिटावर हल्ला करण्याचे बेत चालले आहेत की काय? ह्या घरातल्या खिसेकातरूपासून बचाव करण्याची सरकारने सोय केली पाहिजे बुवा!" आणि ते मोठमोठ्याने हसले. नानासाहेबांचें आपल्या कुटुबावर प्रेम होते वि. सी गुर्जराच्या गोष्टीतील सुखी कौटुंबिक जीवन आपण जगत आहोत अशी त्याची कल्पना होती आणि कौटुंबिक नर्मविनोद करण्याची त्याना वारवार लहर येई डोक्यावर हात जुळवून आरामखुर्चीत बसावयाचे आणि 'सौभद्रा'तलें एखादें गाणें गुणगुणायचें ही त्याच्या दृष्टीने सुखाची परमावधि होती शृंगाराची त्याची हौस अजून मावळली नव्हती आणि आपल्या मोठ्या झालेल्या मुलींच्यादेखत बायकोशीं लघळपणा करण्यात त्याना विशेष मौज वाटत असे.

नानासाहेबानी पाठमोऱ्या विमलाबाईच्या दंडाला आपल्या हाताने नाजुक चिमटा घेतला.

"इश्श, काय हें?" विमलाबाई तुसडेपणाने म्हणाल्या.

सिंधु त्या खोलींतून बाहेर जाऊं लागली.

"अग, अजून काही म्हातारी झालीस नाही तू. सिंधूची मोठी बहीण आहेस असच वाटतं खरं कीं नाही, सिंधू?"

सिंधु एक मुरका मारून म्हणाली, "इश्श!" आणि बाहेर पडली. नानासाहेबाच्या ओठाच्या कोपऱ्याजवळ जमलेली थुंकी पाहून विमलाबाईना शिसारी आली आणि त्या बाहेर जायला निमित्त शोधूं लागल्या.

"आज वेळ मोकळा आहे बुवा मला. तू काल काय म्हणत होतीस

तो सिनेमा पाहूं या." नानासाहेब आरामखुर्चीत ठराविक पोज घेऊन म्हणाले.

विमलाबाई काहीच बोलल्या नाहीत

"बाकी हल्लींच्या ह्या सिनेमात काही मौज नाही बुवा! पहिल्या: काळांतलीं नाटकं खरीं मजेदार असत 'सौभद्रा'त गंधर्व जेव्हा मुरका मारायचा तेव्हा बायका लाजून माना खालीं घालायच्या." आणि मग त्यानी त्या वेळच्या नटाविषयींची एक शृंगारिक हकिगत मोठ्या रसभरितपणें सांगितली.

"पुरे झालं बाई तुमचं. सारखं काय ते अलीकडे असलं बोलता?" विमलाबाई अधिकच तुसडेपणाने म्हणाल्या

ह्यावर नानासाहेब उगीचच मोठमोठ्याने हसले आणि विमलाबाईंना परत एक चिमटा काढण्याचा प्रयत्न त्यानी केला.

सुधा कुमुदहूनदेखील अधिक सकोची वृत्तीची होती त्यामुळे ती कुमुदचें बोलणें शातपणें ऐकून घेत असे कुमुदला ती आपली अगदी ख-र्-री मैत्रीण आहे असें वाटायचें आणि तिच्यावर आपला काही विशेष मालकी हक्क आहे अशा थाटात ती वागायची सिंधूने तिच्याशी बोललेलें-देखील सहन होत नसे.

कुमुद सुधाचा एक हात पकडून तिला सागत होती, "मला किनई तीं काल आमच्याकडे आणलीं होतीं तसली फुल आवडतात . मला किनई दोघी-दोघी मैत्रिणींनी लाब-लाब फिरायला जायला आवडतं...मला किनई आपल्या गायनमास्तराचे आहेत तसले लाब केस मुळीच आवडत नाहीत .. मला किनई सारंगी वाजवायला शिकावंसं वाटत" सारंगी आणि संगीत ह्या-विषयींची कुमुदची माहिती आणि आवड बेताचीच होतीं पण सारंगी आणि मनाचा हळुवारपणा ह्यांची कुमुदच्या मनाने सागड घातली होती आणि आपण हळुवार मनाच्या व म्हणूनच उच्च अभिरुचीच्या आहोत असा कुमुदचा समज वा गैरसमज झाला होता

कुमुदचें हें कंटा वाणें चऱ्हाट ऐकल्यासारखें दाखवीत सुधा एका

मासिकातलीं चित्रें पाहत होती. पण कुमुदला वाटत होतें की, आपण आपल्या हृदयाच्या कुपीतलें अत्तरच तिच्यापुढे ओतीत आहोंत आणि त्याच्या सुवासाने सुधा बेभान झाली आहे.

सिंधूला त्या खोलींत आलेली पाहून कुमुद एकदम बोलायची थाबली. आणि शत्रुत्वाची नजर तिने सिंधूकडे टाकली. सिंधूने तें पाहिलें आणि काहीतरी दुष्टपणा करायची तिला लहर आली.

ती म्हणाली, "काय ग, सारखं 'मला किनई', 'मला किनई' चाललेलं असतं? तू काय स्वत ला सरोजिनी नायडू समजतेस कीं कमलादेवी?" आणि सुधेकडे पाहून तिने एक मर्मभेदक चोरटें हास्य केलें. जणू गुलाबाची कळी किंचित् उमलली सिंधूच्या स्वभावातला हा दुष्टपणा तिच्याविषयीचें लोकाचे आकर्षण वाढवीत असे आणि विशेषतः ज्या पुरुषाच्याविरुद्ध ती हें शस्त्र वापरीत असे त्याना त्यामुळे दुहेरी जखमा होत असत.

त्यामुळे सुधेलादेखील खुदकन् हसूं आलें, आणि म्हणूनच सगळा घोटाळा झाला कुमदच्या कपाळावरच्या शिरा ताड्कन् उडूं लागल्या. तिला वाटलें की, सुधेचे केस ओरबाडावे, की चावे घेऊन तिच्या चेहेऱ्यावर वाभाडे काढावे, की सिंधूच्या ताबड्या-पिवळया ठिपक्याच्या पातळाच्या चिंध्या करून टाकाव्या

सुधेवर सतापून ती ओरडली, "मग कशाला येत्येस आमच्याकडे? चालती हो. परत जन्मात तुझ्याशी एक शब्दही बोलणार नाही." आणि हुंदका फुटायच्या आत ती बाहेर निघून गेली.

त्या प्रसगाचा कुमुदच्या मनावर फार परिणाम झाला. ती मनातल्या मनात बराच वेळ कुढत राहिली. आणि मग, कां कोण जाणे, तिने दुपारीं सिनेमाला जायचें ठरवलें आपल्या मनाने तिने खूपच नट्टापट्टा केला होता, आणि केसांचें एक विशिष्ट वळण घेतल्यामुळे आपण आज सुंदर दिसत आहोत अशी तिची कल्पना झाली होती.

तिला तशी बाहेर पडतांना पाहून सिंधु एक भिवई चढवून लटक्या

गंभीरपणाने म्हणाली, "म्हणजे? वसंतरावाच्याबरोबर सिनेमाला जायचं शेवटीं ठरलं वाटत?"

आपल्या अगावरून कीड गेल्यासारखें कुमुदला वाटलें. पण तिने सिंधूकडे दुर्लक्ष केलें. सिनेमा पाहायला जाऊन बसल्यावर तिच्याशेजारी एक गोरागोमटा पार्शी मुलगा येऊन बसला, तो मधूनमधून कर्कश शीळ घालीत होता, आणि कुमुदशीं नेत्रपल्लवी करण्याचा प्रयत्न करीत होता पण कुमुदच्या तें ध्यानात आलें नाही.

अधार पडला. सिनेमा सुरू झाला, आणि थोड्या वेळाने कुमुदच्या पावलावर दुसरें पाऊल पडलें. पहिल्याने तिला वाटलें की, हें चुकीने झालें असावें. पण परत-परत जेव्हा असें होऊं लागलें, तेव्हा कुमुदच्या ध्यानात एकदम सारा प्रकार आला.

तिचा श्वास एकदम अवरोधला. तिच्या शरीरभर ठोके पडूं लागले. आपल्या रोमारोमातून उष्ण वाफारे येत आहेत असें तिला वाटलें. जग एकदम फिरलें आणि स्थिर झालें.

नंतर त्या मुलाने तिचा हात पकडण्याचा प्रयत्न केला भीतीमुळे आणि एका विलक्षण असहायतेमुळे आपल्या शरीरावरचा तिचा ताबाच नष्ट झाला मोठ्या कष्टाने तिने आपला हात सोडवून घेतला, पण परत जेव्हा तो मुलगा चावटपणा करूं लागला तेव्हा कुमुद अगदी भेदरून गेली. काय करावें तें तिला समजेना, पण त्याच वेळेला तिच्या घशातून घोगरा निषेधाचा आवाज निघाला.

तो अननुभवी, भित्रा आणि आचरट मुलगा तेवढ्याने दबकला आणि त्यानंतर आपल्या जागेवर तो अगदी अंग चोरून बसला होता, अर्थात्च सर्व सिनेमा पाहिल्यानंतर त्याने आपली ही कर्तबगारी आपल्या दोन-चार आचरट मित्राना तिखटमीठ लावून सागितली व त्यानी त्याचें वेडेवाकडें, भित्रें अनुकरण करून आपल्या मूर्ख मनात आनंदाचा एक नवा चोरकप्पा उघडला.

कुमुदला नंतर तो सिनेमा पाहणें अशक्यच झालें. तिचें मन एका

कुठच्यातरी निराळ्याच प्रदेशांत तरंगत होतें. वाटेल तितका प्रयत्न करून-देखील तिला त्या पाशीं मुलाचा राग येईना बधिर मनाने ती घरीं आली.

दारात विमलाबाई तांबड्या-पिवळ्या ठिपक्यांचें पातळ नेसून उभ्या होत्या एका खांबावर रेलून आणि पायाची आढी घालून त्या आपल्या माहेरच्या बाजूच्या कोणातरी पाहुण्याला निरोप देत होत्या "परत इथें आलात म्हणजे आलंच पाहिजे हं आमच्याकडे. नाहीतर कराल चुकवाचुकवी." त्या लाडिक आवाजांत म्हणाल्या, आणि हास्याचें एक लालभडक फूल त्यानी पुढे केलें

वसंतराव शेळपटासारखे सिंधूच्यासमोर वर्तमानपत्र वाचण्याचा बहाणा करीत बसले होते, आणि सिंधु काहीतरी बोलत होती व बोलतांना होणाऱ्या आपल्या ओठाच्या सुंदर हालचालींकडे आरशांत समाधानाने पाहत होती

शंकर सिंधूच्या पातळांच्या चापचोपून घड्या करीत होता.

कुमुद शांतपणें एका कोचावर बसून खिडकीबाहेर पाहत होती. एका उबदार सुस्तींत ती विकलपणें बसून राहिली. खिडकीबाहेरच्या जगावर कोणीं जादूची मूठ टाकली होती इतक्यात एक वेडीवाकडी भडक रंगाची मोटार कर्कश हॉर्न् वाजवीत तिच्यासमोरून गेली. तिला वाटलें की, ती मोटार आपल्या अंगावरून गेली—अगदी खरोखर !

आणि मग ती मोटार सारखी तिच्या अंगावरून जातच राहिली.

# एकटा

घाई-घाईने धापा टाकीत माधव स्टेशनांत आला. तीन-तीनदा त्याने गाडीची वेळ पाहिली. आणि मग नीटसें ध्यानात आलें नाही म्हणून परत वळून त्याने इंडिकेटरकडे पाहिलें. त्याने मनातल्या मनात घोकलें, " अं-सव्वा पाच वाजता–म्हणजे आणखी दहा मिनिटानी, पण पाच वाजून पांच मिनिटें झालीं आहेत ना आता !. " आणि मग परत एकदा त्याने घड्याळाकडे पाहिलें.

मग धावतच तो तिकिटाच्या खिडकीकडे गेला तिकिट-मास्तर काहीतरी लिहीत होता. त्याचें लक्ष वेधण्याकरिता त्याने अधीरपणें आपल्या हातातला रुपया खटखटावला व तिकिट हातीं पडताच तो जागा पकडण्याकरिता गाडीकडे धावला–गाडींत जरासुद्धा गर्दी नव्हती तरी !

गाडींत चढतां-चढता त्याला एकदम आठवण झाली की आपण उरलेले पैसे तिकिट-मास्तरकडून परत घ्यायला विसरलो. झाले ! त्याच्या हृदयाचे ठोकेच एकदम बंद पडले. नख कुरतडायचा तो थाबला. विलक्षण अपराधी भाव त्याच्या चेहेऱ्यावर दिसूं लागला. धापा टाकीत तो परत तिकिटाच्या खिडकीकडे धावला.

तिकीट काढणाऱ्या एका बाईला जवळजवळ ढकलूनच त्याने खिडकीचा कबजा मिळवला. आणि तो बरळला, " चवदा आणे–माझे चवदा आणे–एक रुपयातून उरलेले–ते मगाशीं तिकीट नाही का काढलें ? द्या ना ते परत. "

" अहो, कसले चौदा आणे ? नीट बोला की ! "

" मगाशीं नाही का मीं तिकीट काढलें ? तेव्हा तुम्हीं लिहीत होतात, मग मीं रुपया खटखटावला," माधव अधिकच गागरून म्हणाला.

" कुठचें तिकीट काढलेंत तुम्हीं ? "

" दादरचें–दादरचें "

" हा. मग बरोबर आहे. घ्या हे चौदा आणे मीं निराळेच काढून ठेवले होते कसे धादरटपणाने वागता हो तुम्हीं लोक. आम्हीं गोत्यात यायचे अशाने एखादे वेळीं ." तिकिट-मास्तर आपली शेखी मिरविण्याच्या उद्योगाला लागला

" काय हो ? काय झालें ? " शेजारच्या खुर्चीवर बसलेल्या तिकिट-मास्तरने चौकशी केली

" काही नाही हो. पैसे विसरून गेले हे गृहस्थ." पहिल्या तिकिट-मास्तरने माहिती पुरवली

दुसऱ्या तिकिट-मास्तरने माधवकडे वाकून पाहिलें आणि माधवला उपदेशाचे चार शब्द सुनावले. आणि तेवढ्यात एक खोडकर पार्शी डोळे गरगरवीत म्हणाला, " काय समदा घोटाळा करते तुमी ? आ ? "

बावळटपणें स्मित करीत माधवने हें सारें बोलणें ऐकून घेतलें; जणु तें सारें ऐकायला तो बाधलेलाच होता आणि मग घाईघाईने तो परत गाडीकडे धावला.

धावताना त्या तिकिट-मास्तरला देता येण्याजोगीं अनेक तडफदार उत्तरें त्याला सुचलीं. पण नेहमीप्रमाणे आताहि जरा उशीर झाला होता.

गाडीत चागलीशी जागा पाहून तो आरामशीरपणें बसला. म्हणजे त्याने आपले पाय समोरच्या बाकाला अडकवले आपल्या दोन्ही हातांनी खिडकीचा एक गज घट्ट पकडून ठेवला. आणि त्याच्या वरच्या बाजूच्या गजावर आपलें डोकें टेकलें. आपल्या आवतीभोवती माणसे बसून आपण कधी एकदा गर्दीत अदृश्य होऊ असें त्याला झालें होतें

नेहमी कसलीतरी काळजी करीत राहायची विचित्र सवय त्याच्या मनाला होती. आणि चिंता करण्यासारखा कांही विषय नसला म्हणजे त्याच्या डोक्यांत बेरजा होऊं लागत "...पाच आणि दोन सात, सात चोक अठ्ठावीस, अधिक नऊ, नव्हे साडेनऊ, नव्हे साडेएकुणतीस..." त्या बेरजा

अधिकाधिक क्लिष्ट आणि कंटाळवाण्या व्हायला लागत पुढे-पुढे त्या सख्या तर इतक्या फुगायच्या की त्याचा ताळमेळ लागणेंच अशक्य होई आणि तरी आपला माधव अतिशय आज्ञाधारकपणे त्या साऱ्या बेरजा सोडवायचा, अगदी डोकें फुटून जायची पाळी आली तरी !

आतादेखील तशीच परिस्थिति आली होती आणि मानसिक वेदनांनी आकसलेल्या त्याच्या चेहेऱ्याकडे पाहून शेजारच्या माणसाने विचारलें, "कां हो ? तब्येत बरी नाही की काय तुमची ?" माधव म्हणाला, "छे, छे" आणि आपल्या तोंडावरच्या साऱ्या सुरकुत्या त्याने एकदा स्मित करून पुसून काढल्या. आणि मग काहीतरी प्रसन्न विचार करण्याचें त्याने ठरवलें. '. कल्पना करू या की सुंदर टपोरी मोगऱ्याचीं फुलें आहेत. त्याचा एक सुंदर गुच्छ आपण तयार केला त्याच्या सुवासाच्या धुंदींत आपण खूप-खूप लांब चाललो आहोंत आणि. '

...तितक्यांत एका घाणेरड्या मुसलमानाने पानाची लालभडक पिचकारी पचकन् थुंकली. माधवने तें पाहिलें, आणि त्याच्या अंगावर शहारे उभे राहिले. नव्हे, ती किळसवाणी पिचकारी कल्पनेंतल्या पुष्पगुच्छावरच पडली. त्या थुंकीचे ते ओंगळ बुडबुडे... .

माधवच्या कल्पनेंतला तो पुष्पगुच्छ दूर भिरकावला गेला आणि बेरजांचें कंटाळवाणें चक्र त्याच्या मनात सुरू झालें. मध्येच त्याला वाटलें की, समजा, आता दोन गाड्यांची टक्कर झाली तर ? काय भयंकर जखमा होतील ह्या माणसांना ! कोणाचीं आतडीं लोंबतील, कोणाच्या डोळ्याच्या खाचा होतील. आणि पलीकडच्या त्या सुंदर बाईचे लाल ओठ, मादक डोळे आणि भरदार वक्षःस्थळ ह्यांचा एकच लोळागोळा होऊन जाईल. आणि कावळे त्याच्यावर टोचा मारीत राहतील...

माधवने डोकें घट्ट दाबून धरलें. जगातल्या साऱ्या गोष्टींवर विरूपतेचें सांडपाणी ओतण्याचें काम आपल्या मनांत सारखें का चाललेलें असतें ह्याचा त्याला उलगडा होईना. देवळाच्या दाराशीं जमणाऱ्या भिकाऱ्यांच्या लटांबरासारखें असणारें हे घाणेरड्या विचारांचें लटांबर दूर

कोठेतरी नेऊन बुडवून टाकावें, आणि स्वच्छ, सुंदर, निरोगी होऊन परत यावें अशी त्याची फार उत्कट इच्छा होती. पण सिंदबादच्या मानगुटीवर बसलेल्या त्या थेरड्याप्रमाणे हे विचार त्याचा पक्का पाठपुरावा करीत होते. क्षणभरहि माधवला सोडायला ते तयार नव्हते.

विलक्षण अस्वस्थता त्याला वाटू लागली त्याने कोटाची कॉलर ओढून सारखी केली चेहेरा रुमालाने जोरजोराने पुसला. आणि आपल्या पायाना अडचण होते आहे असें वाटल्यामुळे त्याची चाळवाचाळव केली. पण तरी आपल्या पायाना अडचण होत आहे असें सारखें त्याला वाटत राहिलें. आणि शेवटीं तर त्याला वाटू लागलें की, आपण आता उठून खूप लाब चालत गेलों नाहीं तर आपले पाय निकामी होतील. त्यामुळे त्याच्या शरीरातील स्नायू अधिकच आकसले, आणि अस्वस्थता वाढली.

शेवटीं एकदाचें दादर स्टेशन आलें. माधव खाली उतरला, व नेहेमीप्रमाणे विनाकारण घाईने धक्काबुक्की करीत बाहेर पडला. झपाट्याने चालत तो दूरवर जाऊ लागला बराच वेळ त्याने आपल्या मुठींत घट्ट धरून ठेवलेलें रेल्वेचें तिकीट टाकून दिले नाही.

तितक्यात कोणीशी हाक मारली, "माधव, अरे माधव–"

माधवने भेदरटपणे चारहि दिशाना पाहिले. पण त्याला आपला मित्र दिसला नाही. शेवटी वामनने–त्याच्या मित्राने–त्याच्या पाठीवर थाप मारली आणि म्हटलें, "अरे, असा काय बघतो आहेस बायरटा-सारखा ? अ ?"

ह्यावर काहीतरी विनोदी उत्तर द्यावे असें माधवला फार वाटलें. पण तो इतकेच म्हणाला, " अ .अ .अ. अ तसें नव्हे. "

ह्यावर वामनने त्याला इकडच्या-तिकडच्या चार गमतीदार गोष्टी सागितल्या. वामन देखणा, तल्लख आणि बोलका होता. आणि जसें त्याचें बोलणे अधिकाधिक गंमतीदार होऊं लागलें, तसतसा माधवला त्याचा अधिक राग येऊं लागला. आणि विशेषत. माधवचें मोडकेंतोडकें बोलणें जेव्हा तो शातपणें आणि कौतुकाने ऐकून घेई, तेव्हा माधवच्या संतापाला

पारावार उरत नसे. माधवने चिडून ठरवलें की, प्राण गेला तरी वामनतर्फे विमा उतरायचा नाही अगदी मुळीच नाही.

तेवढ्यात वामन म्हणाला, "अरे, विमा उतरायचा होता ना तुझा? मग चल की उद्या सकाळी डॉक्टरकडे जाऊं या होईल ना वेळ तुला?"

माधव कांहीसें पुटपुटला.

वामन म्हणाला, "अ? काय म्हटलेस?"

माधव घाबरून म्हणाला, "कुठें काय? जाऊं या की आपण. किती वाजतां जायचें उद्या?"

आणि मग वामन जेव्हा निघून गेला, तेव्हा माधव विनाकारण त्याच्याविरुद्ध चरफडत राहिला वामनने आपल्याला फसविलें असा विचित्र ग्रह त्याच्या मनात निर्माण झाला होता.

पाचोळा पेटावा त्याप्रमाणे त्याच्या मनात सूडाच्या भावनेने पेट घेतला. त्याला वाटलें की, हजारो लोकानी आपल्यापुढे हात जोडून क्षमेची याचना करावी, आणि आपण त्याना लाथेच्या ठोकरीसरशी उडवून द्यावे. आपण सहजगत्या दिलेल्या हुकुमामुळे राक्षसी रणगाड्याचे ताडेच्या ताडे कानठळ्या बसविणारा आवाज करीत पुढे सरकावे आणि त्याखाली सापडून शेकडो माणसाचा चुराडा व्हावा आपल्या कल्पनेने माधव च्छिन्नविच्छिन्न देह तुडवीत चालूं लागला रक्ताच्या थारोळ्यानी सारी भूमि चिकचिकित झाली होती, आणि त्या चिखलाने माखलेल्या शरीराचें आक्रंदन चाललें होतें. कोणाचीं आतडीं लोंबत होतीं, आणि कोणाचे चेहरे च्छिन्नविच्छिन्न झाले होते, तरी त्याच्या तंगड्या झाडल्या जात होत्या...

असली भेसूर कल्पनाचित्रे माधवच्या डोळ्यासमोर तरळत राहिलीं आणि डोळे झाकून तो म्हणाला, "पुरे, पुरे हें आता"

ह्या मनाच्या भयंकर यातनातून सुटका करून घेण्याकरिता अधिकाधिक कामांत गुंतणे अवश्य होते. म्हणून त्याने एक अर्ज केला होता. कुठच्याशा औषधें विकणाऱ्या कंपनीला संध्याकाळीं एक तासभर टाइपिंग करायला एक माणूस हवा होता. आणि माधवला त्यानी भेटायला बोलावले होतें.

धडधडत्या छातीने माधवने त्या कंपनीचा पत्ता हुडकून काढला. पाटीकडे तीनतीनदा पाहून स्वतःची खात्री करून घेत तो आत शिरला, आणि चटकन् एका कोपऱ्यात जाऊन उभा राहिला कोणाचेहि लक्ष वेधण्याचा त्याने प्रयत्न केला नाही आणि जेव्हा तिथल्या एका माणसाचें लक्ष माधवकडे वेधलें तेव्हा आपण दुसरीकडेच पहात आहोत असा त्याने बहाणा केला. आपण असें का करीत आहोत हें त्याला कळेना, व मनात असूनहि अधिक धिटाईने आणि नैसर्गिकपणें त्याला वागता येईना.

शेवटीं तेथील एका माणसाने त्याच्याजवळ जाऊन विचारलें, " मला वाटतें, आपण टाइपिस्टच्या जागेकरिताच येथे आला आहात होय ना ? "

त्याने एवढ्या मोठ्याने हें विचारलें की औषधें विकत घ्यायला आलेल्या दोन-चार लोकानी माधवाकडे कुतूहलाने पाहिलें. एका सुंदर बाईनेदेखील !

माधव अगदी भेदरून गेला इतक्या नाजुक विषयावर इतक्या मोठ्याने बोलणाऱ्या त्या माणसाचा माधवला विलक्षण राग आला त्या साऱ्या माणसाचे दृष्टिक्षेप म्हणजे आपल्या शरीरात खुपसलेल्या सुऱ्याच आहेत असें त्याला वाटलें.

तो एकदम बरळला, " छे, छे. त्याकरिता नाही आलों मीं. त्याबद्दल माहितहि नाही मला काही "

तो मनुष्य तितक्याच मोठ्या आवाजात शातपणें म्हणाला, " माफ करा हं आपण इतका वेळ नुसतेच उभे राहिलात म्हणून मला तसें वाटलें. काय काम आहे तुमचें ? "

त्या माणसाच्या शात बोलण्यामुळे माधवला धीर आला त्याला वाटलें की, आपण टाइपिस्टच्या जागेकरिताच आलों आहोत. पण आता तें कसें शक्य होतें ? तो चाचरत म्हणाला, " म्हणजे–तसें नव्हे. पण मला एक औषध घ्यायचें आहे."

माधव एकतर एकदम बरळत सुटत असे, किंवा अतिशय चाचरत बोलत असे बिचाऱ्याला नैसर्गिकपणें बोलताच येत नसे.

तो मोठ्या आवाजाचा मनुष्य म्हणाला, "वा! मग, बोला की तुम्हांला काय पाहिजे तें. सगळ्या औषधाचा स्टॉक् आहे माझ्याकडे. नुक्ताच परदेशाहून माल आलाय्."

परत माधव घुटमळला सारीं माणसें आपल्याकडे पाहून हेटाळणीने हसत आहेत असें उगीचच त्याला वाटलें धादरटपणें त्याने इकडेतिकडे पाहिलें. आणि शेवटीं कपाटातल्या एका ओळखीच्या बाटलीकडे बोट दाखवून तो म्हणाला, "हें, हें औषध हवंय् मला."

त्या माणसाने तें औषध काढून माधवच्या हातात दिलें. आणि साडेसात रुपये बिल झालें असेंहि सागितलें माधवने मुकाट्याने तितके पैसे दिले आणि औषधाची ती बाटली घेऊन तो घाईघाईने बाहेर पडला

झालें. त्याच्या मनाला चिंता करायला एक विषय सापडला. नाही-नाही त्या शब्दात त्याने स्वत:ची निर्भर्त्सना केली. कोणींतरी आपलें मानगूट धरून फाडफाड आपल्या तोंडात मारावें असें त्याला वाटूं लागलें.

आणि अस्वस्थतेचा हा विषय संपला तेव्हा हातातल्या बाटलीचें काय करायचें हाच नवीन प्रश्न त्याच्या डोक्यात निर्माण झाला. त्या बाटलीबद्दल लोकानी चौकशी केली तर त्याना काय उत्तर द्यावें तें त्याला समजेना. मुकाट्याने, कोणी पाहत नाही अशी खात्री करून घेऊन, त्याने ती बाटली गटारात भिरकावून दिली.

पण तरी एका माणसाने माधवचें तें विचित्र कृत्य पाहिलेंच आणि मग तो माधवकडे संशयी मुद्रेने पाहत राहिला. माधवच्या अंगाचा नुसता तिळपापड झाला. 'स्वत: पैसे देऊन विकत घेतलेली वस्तु फेकून द्यायचा प्रत्येक माणसाला पूर्ण अधिकार आहे. लोकाना ह्या बाबतींत तोंड खुपसायचें काय कारण आहे? काय अधिकार आहे?' असलें विचित्र तर्कट त्याच्या डोक्यात भरगळूं लागलें आणि त्या माणसाला चुकविण्याकरिता तो झपझप पावलें टाकूं लागला.

माधवचीं पावलें जिन्यावर वाजलीं तसा त्याचा छोटा भाऊ गाणें म्हणायचा थांबला. त्याची मोठी बहीण आरामखुर्चीवर बसली होती. ती

उठून जामिनीवर बसली. आणि त्याची बायको खाली मान घालून पायाच्या बोटाची चाळवाचाळव करूं लागली.

कपडे काढून माधवने आरामखुर्चीत अंग टाकलें. तासनूतास तो त्या आरामखुर्चीत बसून राहिलेला असे.

त्याची बायको त्याच्याजवळ येऊन मृदु स्वरात म्हणाली, " चहा ठेवूं ना, कीं कॉफी ? "

माधव त्रासिकपणे म्हणाला, " काही नको मला. "

" असं काय बरें ? "

" काही नको म्हणून म्हटलें ना मीं ? "

" मग पोहे करत्यें थोडे. अं ? "

" नको-नको-नको. "

माधवची बायको हिरमुसली होऊन घरात जाऊं लागली. तशी माधव म्हणाला, " मला उपाशी ठेवायचा विचार आहे की काय तुझा ? मी इतका दमून आलोय् तें समजत नाही. पण माझी कोणालाच पर्वा वाटत नाही ह्या घरात. मी म्हणजे कोणी कीडमुंगी आहे अशी समजूत झाली आहे सगळयाची. "

माधवची बायको मागे वळली, आणि आपला राग आवरून म्हणाली, " काय बरें असें सारखे चिडचिडल्यासारखें करता तुम्हीं ? तब्येत का बरी नाही तुमची ? खरेंच, आपण एकदा डॉक्टरला दाखवू या तुमची प्रकृति. माझा मामेभाऊ चागला डॉक्टर आहे त्याच्याकडे जाऊं या आपण. उद्या याल का सकाळीं, अं ? "

माधवने क्षणभर तिच्याकडे पाहिलें. तिचें म्हणणें त्याला पटलें असावें. पण मग कसल्याशा संशयाने त्याला पछाडले आणि तो एकदम उसळून म्हणाला, "काय धाड झाली आहे कीं काय मला ? कीं मला वेड लागलंय असें वाटतंय् तुला ? तुम्हाला वाटतें की तुम्हाला सगळें समजतें. आणि मी मात्र मूर्ख आहे, अजागळ आहे. पण माझें सगळें पाहायला मी समर्थ आहे. मला कोणाची मदत नको, औषधें नकोत आणि सहानुभूतिपण नको.

कशाला माझ्याबद्दल दया दाखवता? मी काय भिकारी आहे की दारचें कुत्रें आहे? मी एकटा-एकटा स्वत.चें सारें पाहायला समर्थ आहे. चालती हो तूं घरात. जाव."

माधवची बायको भेदरून गेली. आश्चर्यानें वेड्यासारखी त्याच्याकडे पाहत राहिली. ती पुटपुटली, "मग हवंय् तरी काय तुम्हाला?"

पण आपल्याला काय हवंय् हें माधवला तरी कुठे पुरेंसें माहीत होतें. आणि जें थोडेसें समजलें होतें ते उमजून घ्यायला त्याचें मन तयार नव्हतें.

पण माधवला त्याची बायको जें देऊ करीत होती तेंच हवें होतें. त्याला तिचीच नव्हे तर साऱ्या जगाची सहानुभूति हवी होती आज व अनेक वर्षें ह्या सहानुभूतीशिवाय त्याचे हृदय तडफडत होतें. आणि आता तर साऱ्या जगाविषयीं इतका द्वेष आणि संशय त्याच्या मनात भिनला होता की कोणी सहानुभूति देऊं केली तर त्याला तो विषाचा प्याला वाटे. त्याच्या स्वाभिमानाला धक्का बसे. दयेची भीक आपल्याला लोक घालीत आहेत असा त्याला संशय येई.

योग्य प्रकारे माधवला सहानुभूति दिली गेली असती तर त्याचें खुरटलेलें जीवन फुलारलें असतें. तो मोठा चित्रकार, कवि अगर तत्त्वज्ञ झाला असता, कारण इतका संवेदनाक्षम माणूस मोठा झाल्याशिवाय कसा राहिला असता?

पण कुठेतरी काहीतरी चुकलें होतें आणि एक व्यक्तिमत्त्व...

माधवला आरामखुर्चीतच थोडा वेळ झोप लागली आणि त्याला नेहमी पडत असत तशा प्रकारे एक विचित्र स्वप्न त्याला पडलें...तो एका चिखलाच्या डबक्यात पडला होता, आणि असंख्य कृमी, कीटक, किडे त्याच्या अंगावरून सरपटत होते. त्याच्या किळसवाण्या स्पर्शानें माधवचें सारें अंग अगदी शहारून जात होतें. ती घाण अंगावरून झाडून टाकावी म्हणून तो अगदी दातओठ खाऊन धडपडत होता. पण त्याचे हातपाय घट्ट बांधून ठेवलेले होते.

डबक्याच्या काठावर उभी राहून एक लावण्यवती तरुणी त्याच्याकडे पाहून मधुर स्वरात हसत होती आणि बोलत होती.

माधव तिच्याशी बोलण्याचा प्रयत्न करूं लागला. पण त्याच्या तोंडातून शब्द बाहेर येण्याऐवजीं ते कृमी-कीटकच बाहेर येऊं लागले...

माधवला दरदराऊन घाम सुटला, आणि तो धडपडून उठला. काय करावें ते त्याला समजेना. आणि मग कपडे करून तो बाहेर पडला. विमनस्कपणें तो चालला होता

भीति, संताप, संशय आणि द्वेष ह्यांच्या घाणीने बरबटलेला त्याच्या जाणिवेचा प्रवाह, सावकाशपणे, रेंगाळत चालला होता बाह्य घटनांचे अडथळे त्यात आले की प्रवाह अडे आणि तीव्र मनोवेदनांचा एक भोवरा तयार होई. आणि ह्या भोवऱ्यातून कसाबसा बाहेर पडून तो प्रवाह पुढें सरकतो न सरकतो तोंच दुसरा अडथळा येई, आणि दुसरा भोवरा निर्माण होई...

मध्येच सिनेमाच्या जाहिरातीच्या चमचमत्या नाचत्या अक्षरांनी त्याला बोलावलें "A breath-taking drama of the Wild West."

चटकन् तिकीट काढून तो आत शिरला. भव्य देखावे...घोडदौडी... सुंदर, मादक स्त्रिया आणि उन्मत्त चुंबनें! साऱ्या जगाला दिपविणारें ज्या प्रकारचें जीवित माधवला जगायचें होतें, ते तो पाहत होता, अनुभवत होता, जगत होता.

शेवटीं अनेक घडामोडींनंतर नायकाची आणि खलनायकाची एका अंधाऱ्या कोपऱ्यात भेट झाली. दोघांचें भयानक मुष्टियुद्ध सुरू झालें. शेवटीं नायकाने हनुवटीवर एक जबरदस्त प्रहार करून खलनायकाला लोळविलें. आणि मग त्याच्या छातीवर बसून तो त्याच्या हनुवटीवर सारखे प्रहार करीत सुटला खलनायकाची धडपड थांबली, विव्हळणें थांबलें, आणि अखेर त्याची मान लोंबूं लागली, तरी नायक त्याला त्वेषाने मारीतच होता. थाड्-थाड्-थाड्—

माधवने आपल्या खुर्चीचे हात घट्ट पकडले होते. त्याच्या शरीरांतील नसन्नस तटारून फुगली होती. आणि त्याच्या डोळ्यात विचित्र लकाकी आली होती.

बस्स! साऱ्या जगावर त्याला असा भयंकर सूड उगवायचा होता.

# पावसाळी हवा

रात्रभर उकाड्याने नुसतें गुदमरून जायला झालें होतें. कधी न धुतलेलें गरम जाकीट घातलेल्या दमेकरी म्हाताऱ्यासारखी हवा झाली होती. शरीर नुसतें चिवचिवलें होतें. आणि मन निपचित पडलें होतें.

पण पहाटेच्या सुमाराला धावत्या सरींचे सपकाऱ्यावर सपकारे मारून पावसाने सारें वातावरण थंडगार करून सोडलें. पाणी पिऊन वाऱ्याने एक भला मोठा थंड सुस्कारा सोडला आणि मग तास-दोन तास ढगाच्या पखाली ताठ भरून आणून रित्या करण्याचा त्याने सपाटा चालवला.

पायथ्यतीचें पांघरूण अंगावर घेऊन मी त्यात गुरगुरलो. जागेपणींच झोपेची सुस्ती मीं अनुभवली. एक प्रकारची सौम्य प्रसन्नता येऊन मला बिलगली. आणि जलबिंदूंनी डवरलेल्या अर्धोन्मीलित मोगऱ्याच्या कळीप्रमाणे माझ्या मनाची स्थिति झाली हातातला खाऊ थोडा-थोडा खाऊन, तो खूप वेळ पुरविणाऱ्या लहान मुलाप्रमाणे मी कंजूषपणें तो आनंद थोडा-थोडा उपभोगीत होतों. मनाच्या गळक्या भाड्यात सुखदु खें साठवून ठेवता येत नाहीत हें मला माहीत नव्हतें थोडेंच ! पण सुखाला आचवलेल्या ह्या दरिद्री जगांत माणसाच्या मनाचा असाच संकोच होतो.

थोड्या वेळाने संधिप्रकाश कुठून तो झिरपूं लागला. आणि पाय आखडून मात्र झोपीं गेलेल्या कादेवाडींतल्या कंगाल इमारतींच्या अंगावरचें अंधाराचें मळकें ठिगळें लावलेलें वस्त्र त्याने दूर केलें. फाटक्यातुटक्या भिकाऱ्यांप्रमाणे दिसणाऱ्या त्या इमारतींच्या कळकट कौलाच्या झिज्यातून पाणी ठिपकत होतें. आणि खिडक्यांचे डोळे किलकिले करून त्या बावळटपणें पावसाकडे पाहत होत्या. इतक्यात कुठचेंसें दार कुरकुरलें, “ ऊं ऽ ऽ ऽ. की [illegible] मा ! ”

मला वाटलें की, कोणाच्यातरी कुशींत डोकें खुपसून आपणदेखील तसेंच कुरकुरावें. मी पांघरुणात आधिकच गुरगुटलों आणि त्या नुसत्या कल्पनेनेच मनातलें समाधान इतकें ओसंडलें की तें कुठें साठवावें तें मला दरिद्र्याला कळेना!

गरम चुलीमागे बसून डोळे मिटून गुरगुरणाऱ्या मांजराप्रमाणे मी कितीतरी वेळ बिछान्यात पडून होतों. पण हळूहळू ती सौम्य प्रसन्नता झिरपून गेली. आणि मनाचें भाडें रिकामें झालें.

घड्याळाची टिक्‌टिक्‌देखील ऐकायला येऊं लागली.

तेवढ्यात घरातल्या दिव्याचें बटन वाजलें उजेडाचा एक लांबट चौकोन जमिनीवर उमटला. माझी आणि त्याची फार जुनी मैत्री! एके काळीं माझ्या आईने बटन दाबलें की, तो माझ्या अंथरुणाशेजारीं येऊन बसत असे. आता बायकोच्या संसारदक्षतेच्या तो हकिगती सांगतो.

थोड्या वेळाने स्टोव्हचें गाणें सुरू झालें. मध्यमवर्गीय संसाराच्या सुखदु:खाचें तें गाणें मीं अनेकदा ऐकलें असेल. पण त्या वेळीं त्या गाण्यांतलें सारें कारुण्य माझ्या हृदयाला जाऊन भिडलें. आणि एका स्निग्ध खिन्नतेचा एकएक थेंब अगदी सावकाशपणें माझ्या मनात ठिपकूं लागला.

समाधान आणि खिन्नता ह्यांचें इतकें जवळचें नातें आहे की, माझ्या मनातील समाधानाची खिन्नता आणि खिन्नतेचें समाधान केव्हा होतें तें माझें मलाच कळत नाही.

ह्या आळसट, नाजुक अनुभूतीचा डाव आता कुजेल अशी भीति वाटायला लागली, तेव्हा चटकन् उठून मी गॅलरींत आलों.

वात्रट वारा मधूनमधून आपले ओले हात झाडून पावसाचे शिंतोडे उडवीत होता. वाळत घातलेले कपडे जागच्या जागीं खिदळत होते. टेलिफोनच्या तारावरून भराभर सरकत जाऊन खाली उड्या घ्यायचा खेळ काही थेंबानी चालवला होता. रस्त्यात मोकळ्या सुटलेल्या एका वासराने एकदम कान टवकारले, नाक फेंदारलें, आणि आपल्या चेपटीशा शेपटीला

हवेंत झुलवत तें तिरप्या उड्या मारीत उधळलें. आणि एक कुत्रा मारे उसन्या वीरश्रीने त्याचा पाठलाग करील मोठमोठ्याने भुंकू लागला.

आकाशात ढगांचे गढूळ पाणी साठून राहिलें होतें. आणि शेणाने सारवलेल्या टोपलीखाली कोंबडीचीं पिलें झाकून ठेवलेलीं असावीं, त्याप्रमाणे मुंबईवर ढगांचें झाकण पडलें होतें.

मला वाटलें की, पंख फडफडावे आणि शेजारच्या विनायकरावांना साद द्यावी, 'कू–कू–कू'...की दोन्ही डोळ्याचीं बुबळें नाकाजवळच्या कोपऱ्यात आणावीं आणि सर्कशींतल्या विदूषकाप्रमाणे कान हलवावे...की झाडाच्या पानावरचे पावसाचे थंडगार थेंब ओठांनी टिपून घ्यावे...की दहीभातात मेतकूट हवें म्हणून आजीजवळ हट्ट धरावा...

अगदी वेडोबा झालों होतों मी!

तितक्यांत चहाच्या कपबशा वाजल्या आणि मी चूळ भरायला घाईघाईने मोरीजवळ गेलो. वाटेंत अंथरुणें चुकविताना माझ्या पायाला [illegible], व चांगलीच कळ गेली मग शामचा भोवरा तळ-पायाला टच्‌दिशी टोचला आणि चूळ भरून मान वर केली, तेव्हा तावदावर शिंकें हापटलें आणि आंतल्या बटाट्यानीं भराभरा खाली उड्या घेतल्या.

पण असें झालें तरी मी चिडलो नाही बायकोवर अकारण चरफडलों नाही. उलट मला हसूं आलें. आणि माझ्या अडगळीच्या आणि टीचभर संसाराविषयीं विलक्षण स्निग्ध भाव माझ्या मनात काठोकाठ भरून आला. वाटलें की, आपल्या संसाराचें हे शिंकें घासून-पुसून स्वच्छ करावें आणि तें कांदेबटाटे, कॉलीफ्लॉवरचा एक कांदा, गुळमट नारळाची एक वाटी, व हिरव्याचार ताज्या मिरच्या आणि कोथिंबीर ह्यांनी भरून ठेवावें!

बायकोने चहाचा कप पुढे ठेवला. त्याच्या वाफेचा मंद वास मीं मोठ्या रसिकतेने घेतला. कपाच्या कानाला चिमटा घ्यावा असेंदेखील वाटलें.

तितक्यांत कपांत एक चहाची [illegible] तरंगत होती, ती कमलने चटकन् ओठाने टिपून घेतली. मग तिला काय वाटलें कोण जाणे, तिने चहा [illegible] बशीत ओतून दिला.

माझ्याकरिता कोणीं प्रेमानें अशा लहानसहान गोष्टी केल्या की माझें मन कधी-कधी एकदम आर्द्रतेने भरून येतें डोळयात बोट गेलें म्हणजे डोळा जसा टच्कन् पाण्याने भरून येतो ना, तसें त्या वेळेला असेंच झालें आणि मग मनाची ही स्थिति लपविण्याकरिता मी दोन्ही हात माज्यावर हापटले आणि मान तिरकी करून छताकडे पाहूं लागलो—अगदी बेफिकीरपणें !

कमल खुदकन् हसली. त्यामुळे मी ओशाळलो आणि हसलोंहि. कमल तशीच स्निग्धतेने माझ्याकडे पाहत राहिली. आणि मी तिच्या गोऱ्या, वत्सल हाताकडे पाहत राहिलों.

आम्ही दोघे कधी-कधी असा वेडेपणा करतों

चहा पिऊन मी बाहेर आलों. शाम नुकताच जागा झाला होता. तो अंथरुणा वरच गुडघे पोटाशीं घेऊन ‘ गुर्रर म्याव ’ अशी माजराची नक्कल करीत होता.

मीं विचारलें, “ काय रे, शाम ? ”

शाम उत्साहाने म्हणाला, “ एक बिटुकला उंदीर आपल्या कपाटा-खाली गेलाय त्याने घाबरून पळून जायला हवें म्हणून मी माजर झालोंय्.”

शामची कल्पना मला फारच आवडली. आणि मीदेखील गुडघे पोटाशीं घेऊन त्याच्याशेजारीं पडलों. व ‘ गुर्रर म्याव ’ करायला लागलों. पण तो धूर्त उंदीर ह्या सोंगाड्या मांजराना मुळीच घाबरला नाही. तशी शामला आणि मला खूप हसूं आलें

तेवढ्यात वर्तमानपत्रें आली तशी आरामखुर्चीत बसून मी तीं वाचायला लागलों इतक्यात नेहमीप्रमाणे शेजारचे अण्णा डोक्यावर टोपी घालीत-घालीत घाईघाईने आले, आणि म्हणाले, “ बाहेरच निघालोंय् मी आतां. तेव्हा जायच्या आधीं जरा वरवर नजर टाकूं दे मला.”

अण्णानी वर्तमानपत्रं मागितल्यावर मीं त्याच्याकडे दुर्लक्ष करण्याचा एकदोनदा प्रयत्न केला होता. पण त्याचा परिणाम इतकाच झाला होता की, त्यापुढे ते माझ्या हातातलीं वर्तमानपत्रें हिसकावून घेऊं लागले होते.

त्या दिवशीं मात्र मीं मनाचा हिय्या केला. भुवयाचा संकोच करून

आणि डोळे शक्य तितके बारीक करून मीं माझा चेहेरा शक्य तितका दुष्ट केला. आणि म्हटलें, " हें पहा, अण्णा, फार दिवस सहन केलें मीं हें आता. वर्तमानपत्राकरिता माझे दरमहा पाच रुपये खर्च होतात, आणि तीं तुम्हीं मला धड वाचूनदेखील देत नाही ह्याचा अर्थ काय? This must stop now." आणि मीं नाक फेदारून दृढ निश्चय व्यक्त करण्याचा प्रयत्न केला.

अण्णाच्या चेहऱ्यावर कोणींतरी पोस्टाचा काळा ठसा उठवल्यासारखें झालें. ते नैतिक चिरड व्यक्त करून म्हणाले, " बाबूराव, बाबूराव, अहो, तीन दमडीचीं वर्तमापत्रें तीं काय, आणि त्याच्याबद्दल एवढा कांगावा तो कसला! इतक्या हलक्या मनाचे तुम्हीं असाल असें नव्हतें मला वाटलें "

मी भुवया अस्मानात चढवून आणि तोंडाचे कोपरे रुंद करून उपरोक्त व्यक्त करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत म्हणालों, " हो. आणि आमच्या दारातलें दोन दमड्यांचें कोळशाचे पोतेंदेखील आपल्याच मालकीचें आहे असें आपलें कुटुंब समजत असतें!"

अण्णानी काढता पाय घेतला. आणि मी मनातल्या मनांत खूप खिदळलों. मिष्किल आनंदाचे रंगीबेरंगी फवारे माझ्या मनात इतस्ततः उडाले. आणि जीवित हें वॉल्ट् डिस्नेच्या रंगीबेरंगी कार्टुन् पिक्चर्सारखें आहे असें वाटूं लागलें फार काय, माझी एक आवडती नटी दुष्टपणाने वागताना नाकाला जशा सुरकुत्या पाडते, तशा माझ्या नाकाला पाडता येतात की काय तेंदेखील मीं आरशात पाहिलें.

अण्णा आता चाळभर माझी बदनामी करतील ह्याची मला धास्ती वाटली नाही. माळ्यावरचीं कबुतरें हुसकावून लावायला अण्णाच्या घरातली लांब काठी आता मिळायची नाही म्हणून मी चिंताग्रस्त झालों नाही. त्रावणकोर स्वतंत्र झालें, आणि त्यामुळे नारळाची किंमत बारा आणे झाली तरी बेहत्तर, असें वाटण्याइतक्या अफलातून मनःस्थितींत मी होतों.

माझ्या मनाला वेळीं-अवेळीं टोचणाऱ्या भीतीच्या आणि चिंतेच्या सुया त्या दिवशीं बोथट झाल्या होत्या. भरधाव जाणाऱ्या उत्साहाच्या घोडागाडीच्या मागच्या दांडीला चोरटेपणाने लटकून मी दूरवर जात होतों.

गॅलरीच्या कठड्याला रेलून मी उभा राहिलो पाऊस मधूनमधून चिरचिरत होता. रस्त्यात पाण्याची आणि चिखलाची नुसती चिकचिक झाली होती. आणि त्यात शेण, गवताच्या काड्या, आणि फुलवाल्याचा कचरा ह्यांचें घाणेरडें मिश्रण झालें होते समोरच्या हॉटेलच्या टेबलावर चहाच्या वर्तुळाभोवती माशा घोंगावत होत्या सोडावॉटरच्या बाटल्यांची एक भलीमोठी गाडी रडत-कढत चालली होती कुत्रीं उगीचच भांडत आणि केकटत होतीं. आणि दोन-चार गुजराथी निर्लज्जपणें माझ्या खाजवीत रस्त्यांतून चालले होते.

पण थंडगार वारा इतक्या अवखळपणें पिंगा घालीत होता की, कानांत पीस फिरविल्यासारखें वाटत होतें आकाशात भलेमोठे ढग आपलीं लठ्ठ पोटें सावरीत लगबगीने चालले होते–दक्षणेकरिता धावणाऱ्या भटजी-प्रमाणे ! उन्ह मध्येच कौलावर उतरत होतें, आणि मग परत वर जाऊन ढगाच्या पोटाना गुदगुल्या करीत होतें.

तितक्यात डाव्या हाताच्या कोपऱ्यातील झाडाकडे माझें लक्ष गेलें. आणि मनातील वर्दळ एकदम थाबली रेडिओ-स्टेशनवरच्या एखाद्या निस्तब्ध, काळोख्या, थंड स्टुडिओत गेल्यासारखें वाटलें.

पावसामुळे त्या झाडाची कांति एकदम बदलली होती छचोर स्त्रीच्या चोळीसारखा तकतकीत पोपटी-रंग त्याना प्राप्त झाला होता. शरीराला उत्तान ओळखेपिळोखे देऊन तीं पर्जन्याला मुजरा करीत होतीं आणि क्षितिजरेषा तर इतकी धुद झाली होती की, मदिरेने बेहोष होऊन आपलें वस्त्र फेडून आपल्या प्रियकरापुढे निर्लज्जपणें उभ्या राहिलेल्या पुष्ट स्त्रीच्या नेत्रातील उन्मत्त कामवासनाच तेथे साखळली आहे की काय असें वाटत होतें.

त्या क्षणीं मी खूप उंच उचलला गेलो. शीतल मेघराशींवर मी बेहोषपणें गडबडा लोळलों. आकाशातल्या रसरसलेल्या निखाऱ्यावर पाय पडून मला चरचरीत चटका बसला, सोसाट्याचा वारा माझ्या शरीराच्या रंध्रारंध्रांत शिरला, आणि गुदगुदल्या करून त्याने मला कासावीस केलें. कंठाला शोष पडून माझें शरीर ठणकूं लागलें, व मग हिमवृष्टीने तें गोठून गेलें.

आणि विश्वाच्या कोषांत मी एकव्यानेच युगानुयुगे निद्रा केली.

अनुभूतीची उसळून आलेली ही लाट मनावर धाड्दिशीं आघात करून ओसरली. व पाण्याने भिजलेल्यावर कुत्र्याने अंग झाडावें, तसें माझ्या मनाने केलें

दुसऱ्या क्षणीं एरिअलच्या उंच बाबूवर बसून तिरकी मान करणारा मी कावळा झालों आणि माझी काकदृष्टि रस्त्यातून जाणाऱ्या एका पुष्ट मध्यम वयाच्या स्त्रीकडे लावली. चापचोपून बसविलेले तिचे काळेभोर नितळ केस आणि त्यात रेखलेली भागाची लाडिक रेषा, ठसकेबाज अंबाडा, आणि उठावदार पण सोशिक वक्षःस्थळ, तिचें लाल किनारीचें काळें पातळ आणि गोऱ्या टाचावर सावकाशपणें रुळणारी कासोट्याची पट्टी ! मंद गतीने ती पुढेमागे पुढेमागे होत होती.

तिच्याकडे साभिलाष नजरेने पाहताना मला शरमदेखील वाटली नाही.

मग कडकडीत पाण्याने मी मनसोक्त अंघोळ केली. अंग कसें अगदी खरपूस शेकून, नव्हे भाजून, निघालें. गरम पाण्याच्या मीं इतक्या चुळावर चुळा टाकल्या की, माझे दात शिवशिवूं लागले आणि खरखरीत टॉवेलने जेव्हा मीं शरीर घासून-घासून पुसलें, तेव्हा चैतन्याचा विद्युत्प्रवाह माझ्या अंगभर खेळूं लागला

वाटलें की, नदीच्या प्रचंड पुरात शरीर फेकून द्यावें आणि प्रवाहाच्या धारेंत बेदरकारपणें घुसावें. उत्तुंग कड्याच्या अगदी टोकावर उभें राहून बेदरकारपणें नजर खाली टाकावी. लोखंडाच्या जड तुळ्या नेऊन खादा चोळटून निघावा, आणि श्वास लागून छाती फुटायची पाळी यावी...

दुपारीं जेवण जरा जास्तच झालें. आणि कुटलेल्या सुपारीचा बोकाणा भरून आरामखुर्चीत पसरलों.

आता पावसाची चांगली काळोखी आली होती. आणि त्याने संथ धार धरली होती. थंडाव्याने तुडुंब भरलेली हवा अगदी सुस्तावली होती. पावसाच्या आवाजाची लय सर्वत्र भरून राहिली होती. आणि मधून-मधून खिडकींतून येणाऱ्या फवाऱ्यांमुळे सुखद संवेदना शरीरभर पसरत होत्या.

काळोखीमुळे डोळे सुखावले होते पण झोप येईना. जागृतीचें सुख सोडायला मन तयार नव्हतें. काहीतरी सुंदरसें पुस्तक वाचावेंसें वाटूं लागलें. असल्या हवेत नवीं अनोळखीं पुस्तकें वाचावयाचीं नसतात. तर ज्याची आपल्याशीं पुष्कळ दिवसाची घसट आहे अशीं जुनीं पुस्तकें पुन्हा एकदा चाखतमाखत वाचायचीं असतात. भीति, साहस, क्रूर सूर, सडक्या मासासारखी दुर्गंधि येणारे दुष्ट कट आणि कामवासनेचा उग्र प्रक्षोभ ह्याच्या दाट जंगलातून बेदरकारपणें प्रवास करणाऱ्या निधड्या छातीच्या माणसांच्या संगतींत तो प्रवास पुन्हा एकदा करावा असें वाटतें. तर क्वचित् हिरवीं कुरणें, दाट अरण्यें आणि डोंगरकपारी ओलांडून स्वप्नसृष्टीचें इंद्रधनुष्य हस्तगस्त करणाऱ्या नायकाच्या घोड्यामागून आपलेंहि तट्टूं दामटावें असें वाटतें.

पावसाळी हवेशीं ज्याच्या वातावरणाचें साधर्म्य आहे अशीं इंग्रजी पुस्तकेंच अधिक आहेत. आणि म्हणून शेल्फरच्या Sherlock Holmes कडेच माझें चटकन् लक्ष गेलें.

पण तितक्यात दिघ्याच्या ' सराई 'तील वैभवशाली वनश्रीचा भव्य, विस्तीर्ण आणि रागडा पट्टा डोळ्यासमोर उभा राहिला एकनिष्ठ आणि अपरिहार्य प्रीतीच्या काळ्याकभिन्न एकाकी सुळक्याच्या टोकावर निर्भयपणें उभी राहिलेली चंदेरी परी लाडी, धुंद सुगंधाने दरवळणाऱ्या केतकीभोवती विळखा घालून फुसफुसणऱ्या कृष्णसर्पाप्रमाणे असणारा पापी तुकाराम फॉरेस्ट रेंजर, सह्याद्रीच्या उंच, रागड्या आणि उघड्या-बोडक्या जाभ्या दगडाप्रमाणे असलेले बाप्पाजी व त्याच्या हृदयांतून झुळूझुळू वाहणारा माणुसकीचा झरा, आपल्या नैसर्गिक प्रवृत्तींप्रमाणे अनिर्बंध जीवन जगणारे निष्पाप मनाचे कातोडी आणि तो गरीब बापडा पण आनंदी अंधू! मल्लाच्या कमावलेल्या शरीराप्रमाणे पिळदार असलेले त्यांतले प्रसंग ! रसरशीत डाळिंबातला जणु एक-एक टपोरा दाणाच !

त्यात कादंबरींत पावसाची झिमझिम आहे, पिवळें ऊन्ह व लाजरें इंद्रधनुष्य आहे, आणि पर्जन्याचा उग्र प्रक्षोभपण आहे.

त्या दिवशीं परत-परत त्या पुस्तकांतलीं पानें मीं वाचलीं. कितीतरी

वेळ वाचीत होतों. त्यानंतर मात्र डोळे पेंगुळले, आणि अगदी सावकाशपणें झोपेचा पडदा जाणिवेच्या रंगभूमीवर ओढला गेला—इतक्या सावकाशपणें की, जागृतीचा अगदी अखेरचा क्षण आपल्या हातीं लागावा अशी जी माझी विचित्र इच्छा आहे ती जवळजवळ पुरी झाली.

असा किती वेळ मी झोपलों होतों कोण जाणे !

शेवटीं झोपेचा पडला किराकिरत वर खेचला गेला, तेव्हा मनाच्या रंगभूमीवर काळोख होता. फक्त पावसाच्या सर्द कुरबुरीची जाणीव होती. हळूहळू प्रकाशाच्या चौकोनाची खिडकी झाली आणि मनांतल्या एका कोपऱ्यांतल्या अंधुक इच्छेचा एक चहाचा कप झाला. गरमगरम कडक चहाचा जिभेला बसणारा चटका मला हवा होता. त्यावर साबुदाण्याच्या खिचडीचा लचका मी चघणार होतों. त्यातल्या हिरव्या मिरचीच्या तुकड्याने, आधीच चहाने पोळलेल्या जिभेवर झोंबणारें औषध लावायला हवें होतें. आणि त्यानंतर आंबट व घट्ट दह्याची कवडी मी अलगद तोंडांत टाकणार होतों.

मनांतल्या अशा कल्पना सहसा पुऱ्या होत नाहीत पण त्या दिवशीं मात्र सगळा कार्यक्रम मला हवा होता तसा तपशीलवार झाला. फार काय, एक धिम्या लयीतलें गोड भावगीतदेखील शेजारच्या वसंत-रावांनी आपल्या ग्रामोफोनवर लावलें.

त्यानंतर मग वाऱ्याने पावसाला पिटाळून लावलें. उघड्यावाघड्या शहराने उन्हाचा फाटका शर्ट घातला. पाखरानी भराऱ्या मारल्या व एकच किलबिलाट केला. त्रस्त इमारतींनी कपाळावरचा घाम निपटला. व्हिक्टोरिया-वाल्यांनी नव्या उत्साहाने आपले चाबूक फडकावले. साचलेल्या पाण्यांत मुलें डुंबूं लागलीं.

आणि इतका वेळ कोंडलेल्या सूर्याने लाल, नारिंगी आणि पिवळ्या रंगांची पश्चिमेला उधळपट्टी करून आपल्या प्रकाशाची किमया साऱ्या जगाला दाखवली.

म्हटलें तर प्रसन्न, म्हटलें तर खिन्न, असें मन झालें होतें. बधिरता

मन:पटल व्यापून राहिली होती. आणि कल्पना आडवाटेने कुठेतरी दूर निघाली होती.

रेनकोट न घेताच मी बाहेर पडलों आणि मधूनमधूम येणाऱ्या पावसाच्या शिडकाव्यानी भिजत समुद्रावर फिरायला गेलों.

तेथे वाऱ्याला नुसता पूर आला होता. आणि सारें आसमंत ओल्या उन्हाने भिजून गेले होतें पूर्व दिशेची झाडाची हिरवी किनार पिवळें हास्य करीत होती. प्रीतीचा पहिलाच अनुभव आलेल्या तरुणीने स्वतःशींच केलेल्या हास्यासारखें तें हास्य होतें त्याच्या अलीकडचा पाण्यामुळे काळाभोर झालेला डाबरी रस्ता दुर्योधनाच्या उघड्या मांडीसारखा वाटत होता. वारा पिऊन टेर झालेला दर्या जागच्याजागीं डुचमळत होता. आणि पाढऱ्याशुभ्र शिडाची एक चिंधी मधेच फडफडत होती. जणु विनयाची त्रेधा उडाली होती.

थोड्या वेळाने समुद्राच्या डुचमळत्या पाण्यात लालभडक सूर्यबिंब बुडालें, आणि मग इतका वेळ क्षितीजाआड दबा धरून बसलेले काळे आडदांड मेघ पुढे सरसावले व त्यानी आकाशांतले दिवे विझवून टाकले.

बधिरपणें मी त्या दृश्याकडे पाहत होतों. मनाला काय खुपत होतें, कोण जाणे! पण दुखऱ्या डोळयाप्रमाणे त्याची अवस्था झाली होती. फार वारा लागल्यामुळे डोळ्याची आग व्हायला लागली. शरीर विकल झालें आणि डोकें दुखूं लागलें.

मी घरीं परतलों, आणि थोडेंसें जेवून अंथरुणावर पडलों.

निर्दय नवऱ्यासारखा पाऊस परत मारझोड करायला लागला होता. आकाश गुदमरून गेलें होतें. आसुडानी झोडपल्या जाणाऱ्या माणसांप्रमाणे इमारतींनी चेहरे केले होते. गॅसचे फिकट पिवळे दिवे अगदी भेदरून गेले होते. आणि हिंस्र श्वापदासारखा पाऊस बाहेर गुरगुरत होता.

कां कोण जाणे, पण भीतीची शिणिक माझ्या सर्वांगांतून गेली. आणि मग अंधाऱ्या बिळात लपून बसलेल्या जखमी घुशीप्रमाणे भीति माझ्या मनांत दबा धरून बसली.

तसें पाहिलें तर मी मऊ बिछान्यावर पांघरूण घेऊन झोपलों होतों. खोलींत विजेचा झगझगीत दिवा होता. आणि खिडक्या, दारें सर्व बंद होतीं. सारें काही मऊ, कोरडें आणि प्रकाशमय होतें आणि तरी...

मागे कोकणांतला आमचा एक कुत्रा वाघाच्या तावडींतून सुटून आला होता तो सारखा एका अंधाऱ्या कोपऱ्यात पडून राहिला होता भीतीने त्याचे केस ताठ उभे राहिले होते. मानेवर एक लालभडक विद्रूप जखम झाली होती व त्याचे डोळे भीतीने हिरवे झाले होते आणि कोणी जवळ आलें की तो गुरगुरायचा.

अगदी त्या कुत्र्यासारखी माझ्या मनाची अवस्था झाली होती. आणि डोक्यांत हळूहळू वेदनाचे ठोके पडत होते

इतक्यात वीज कडाडली, आणि आकाशाला तडा गेला. त्या विद्रूप जखमेतून रक्त भळभळा गळत आहे असें वाटलें. अंगावरून शहाऱ्यांचे विंचू धावले. आणि भीतीच्या जबड्यातली लालभडक जीभ लळलळली.

अस्वस्थतेने अगदी ओरबडलें म्हणून, मी जोराने किंचाळून हाक मारली, "कमलऽ–"

मोरींतलें काम टाकून ती घाईघाईने माझ्याजवळ आली. श्रमामुळे तिचा चेहरा लालसर झाला होता. श्वास घेताना नाकपुड्या स्फुरत होत्या. वक्ष.स्थळ मंदपणे वरखाली होत होतें आणि तिच्या चेहऱ्यावर व गोऱ्या, नाजुक हातावर पाण्याचे थेंब उडाले होते

तिने मृदुवत्सल आवाजात विचारलें, "काय ? डोकं का दुखतंय् ? गोळी देऊं का ? अं ? "

तिच्या मृदु आवाजाने माझ्या कावऱ्याबावऱ्या झालेल्या मनोवृत्ती स्थिरावल्या बधीरपणें मी तिच्याकडे पाहत राहिलों.

तिच्या गोऱ्या, नाजुक हातावरील पाण्याच्या थेंबात मला त्या दिवशींच्या अनुभूतीचें इंद्रधनुष्य दिसत होतें

आणि डोक्यात मंद वेदनाचे ठोके पडत होते.

# गं गा ध र   गा ड गी ळ

बा. सी. म र्ढे क र

['सत्यकथा', जून १९४७, च्या अंकांतील 'आजकालचे लघुकथालेखक' या लेखमालेंतील लेख संपादकाच्या सौजन्याने]

# गंगाधर गाडगीळ

[ लेखक : बा. सी. मर्ढेकर ]

फौंडरींत मराठी अक्षराचे खिळे जरी झपाट्याने पडत असले आणि छापखान्यांतून त्यांची जुळवणी जरी 'जादा तासा'नी होत असली तरी स्वतंत्र, भेदक आणि विशाल प्रतिभेचा प्रत्यय मराठी वाङ्मयांत सध्या तरी फारसा येत नाही. चुणचुणीत नि टुणटुणीत लिखाण पैशाला मणभर; पण वाढत्या वयाला साजेशी प्रगल्भता, उत्तुंग सहानुभूति, नितळ करुणा, व्यापक सौहार्द, धीराची ध्रुवदृष्टि आणि ह्या सर्वांच्या समन्वयांतून भावनांचीं भव्य व अजरामर लेणीं कोरणारें शब्दकाम ह्यांची मात्र वाण अशी बोचक परिस्थिति आहे. काव्यात वर्तमानपत्री, ॲटम-बॉंबी अयथावत्‌पणा म्हणजेच प्रतिभेचा नवा उन्मेष असें विद्रूप समीकरण बनलें आहे; नि ढोबळ, बुरसुरी आलेल्या शब्दाची मारहाण अथवा शिरशिरी भरलेल्या वाक्‌प्रचारांची सलगी ऐसपैस वाढत आहे. कादंबरींत अनुभवाच्या उथळ पात्रांत रंगलेलें हिरवें शेवाळ काळें होऊन फाटायला लागलें आहे. संवेदनांची वाळू खडकाचा कणखर आकार धरूं शकत नाही; आणि आशयाचीं फुटकीं खापरें झालीं तरी त्यांवरच कल्पनांच्या वेलबुट्या चितारल्या जात आहेत. नाट्यसाहित्यांत खसखस पिकते, पण दाणा भरत नाही. वाङ्मयातल्या ह्या मुख्य प्रकारांत असें दारिद्र्य जाणवत असताना लघुकथेचेंच तेवढें अंग झाकलेलें आहे असें म्हणायला जरा धार्ष्ट्यच लागेल हें निर्विवाद. पण 'सत्यकथे'चे संपादक, आणि ह्या लेखमालेंतले लेखकच नव्हे तर तींत गोवलेले खुद्द लघुकथा-लेखकहि ह्यापेक्षा अधिक समंजसपणाचे भागीदार आहेत असें मानणें उचित. त्यामुळे लघुकथेच्या उघड्या अंगावर, बोटभर का होईना, पण

प्रामाणिक सुताची चिंधी चढविणाऱ्या कांही कलावंतांची कुसर आपुलकीने, कृतज्ञतेने ओळखावी, ज्या मागावर त्यांनी आपलें सूत इमानाने ओढलें त्या मागाची बैठक पारखावी; जमल्यास इकडचा हा एक सैल धागा किंवा तिकडचा तो जास्त ताणून तुटलेला दुसरा धागा दाखवावा, आणि आहे यापेक्षा मोठ्या मागाच्या पायाशीं बसून, आज जिथे बोटभर चिंधी तेथे उद्या पांच वार कापड काढण्याची हिंमत कुणांत पेरतां आली तर, आपल्या समजुतीप्रमाणे; पेरावी,—ह्यापेक्षा अधिक चातुर्याचा आव किंवा प्रतिष्ठितपणाचा अभिनिवेश प्रस्तुत लेखमालेच्या भूमिकेंत बसत नाही. प्रस्तुत लेखातहि तो आव अथवा तसला अभिनिवेश अभिप्रेत नाही.

मराठी लघुकथेची जुनी लाज नव्या सुताने राखण्याचा प्रयत्न करणाऱ्या काही थोड्या लेखकांपैकी श्री. गंगाधर गाडगीळ हे एक आहेत. त्याची पहिली गोष्ट, "प्रिया आणि माजर", जुलै १९४० मध्ये प्रसिद्ध झाली. त्यानंतर गेल्या सहा वर्षांच्या अवधींत त्यानी निरनिराळया नियत-कालिकांतून प्रसिद्ध केलेल्या लघुकथांची संख्या पंचवीसच्या आसपास भरते. त्यांपैकी "मानसचित्रें" ( १९४६ ) ह्या पुस्तकांत संग्रहित केलेल्या आहेत, उरलेल्या अजून नियतकालिकांतच विखुरलेल्या आहेत. ह्या पंचवींसएक कथांचें माप पुरें भरायच्या अगोदरच गाडगिळांच्या प्रतिमेने वाचकांना चटका लावला होता. त्यामुळे त्यांची नवी गोष्ट म्हटली की वाचकवर्ग उत्सुक अंतःकरणानें तिचें स्वागत करायला तत्पर राहूं लागला. तिचा मथळाहि न वाचतां ती एक तर "ताज्या आइसफ्रुटसारखी" "मजेशीर" नाही तर "बाजरीच्या कुरकुरीत भाकरीसारखी" "शेकून" खरपूस झालेली तरी खास असलीच पाहिजे एवढा कयास, गाडगिळांच्या आवडत्या शब्दांत, रसिक विश्वासाने बांधूं लागले. गाडगिळांच्या प्रत्येक गोष्टीच्या मूल्यमापनांत रसिकांची एकवाक्यता झालीच असेल असा अट्टाहास अर्थात्‌च कुणी धरणार नाही. पण रसिकाच्या आतुर अपेक्षेचा भंग गाडगिळांच्याकडून कधी पूर्णपणें झाला असेल असें वाटत नाही. कारण, कधी व्रात्य मुलांच्या संगतींत कल्पनेला टपली मारीत, तर कधी अस्वस्थ नि एकाकी वृद्धांच्याबरोबर

ओकया मनातील बेडकांचीं शिंगें धुंडाळीत, कधी नटव्या सौंदर्याकडे तिरव्या डोळ्याने पाहत, तर कधी बावळट सालसतेवर भावनाचे इंद्रधनुष्य फेकीत, कधी पानपट्टीवाल्याच्या आरशातील तावळ्या तोंडाचीं प्रतिबिंबें न्याहाळीत, तर कधी गिचमिडलेल्या अत करणाच्या तापाला थर्मामिटर लावीत,—नेहमीच गाडगिळानी आपल्या अनुभवाच्या सुताचा पीळ स्वतंत्र ठेवला आणि आपल्या प्रतिभेच्या मार्गावरची वैशिष्ट्यपूर्ण वीण सरकूं दिली नाही. ह्या पिळांत दमदारपणा किती आहे नि ह्या विणीचा पसारा केवढा आहे हें अजून ठरायचें आहे. तथापि, ह्या कलावंताच्या कुसरीचा मागोवा कौतुकाने आणि कुतूहलाने, तद्वत् चिकित्सक आस्थेने आणि डोळस उत्साहाने, जाणते मराठी वाचक आज घेत आहेत हें निश्चित.

गाडगिळाच्या पदरात आजपावेतों जें यशाचें माप पडलें आहे त्याला त्याची गोष्ट सागण्याची शैली हें एक अगदी प्राथमिक कारण आहे. तिचा घाट स्वतंत्र आणि रेखीव आहे. गाडगिळाच्या कथात कथेपेक्षा कथनाला, प्रसगापेक्षा वृत्तीला प्राधान्य असतें. आणि ह्या प्राधान्याचा ठसा ते आपल्या निवेदनशैलींत बिनचूक उमटवू शकतात. द्रुतगतीने वाक्यें ओलाडणारी ही शैली दिसायला सहज नि निर्हेतुक दिसली तरी तिचें सौंदर्य नखशिखान्त आखलेलें आहे. तिची कलात्मक परिणामकारकता फार कुशल हाताने आणि विविध आविष्कारसाधनानी साधलेली असते. ह्या सर्व आविष्कारसाधनाची बारकाईने छाननी केली तर त्यापैकी प्रमुख साधन विरोधांत सापडेल. गाडगीळ आपल्या कथाची उभारणी सामान्यतः दुहेरी, तिहेरी, चौफेरी विरोधी लयात करतात, आणि आशयातला हा विरोधी लय ते आविष्कारांतहि टिकवितात ‘कडू आणि गोड’ या गोष्टींतील आरशा-पुढली सुरुवात आणि आरशापुढीलच शेवट ह्यात नवराबायकोच्या भूमिकांची अदलाबदल करून साधलेला विरोध केवळ बहारीचाच नव्हे तर गोष्टीच्या आशयाची झुलती कमान एकदम विशाल करणारा आहे. सुरुवातीला स्थिर अशा घरात ‘पातेल्यात बसून गरगरा’ फिरणारें मोहनचें शरीर आणि शेवटीं धावत्या आगगाडींत झोपेला येऊन स्वप्नातल्या कल्पनाना गरगरा फिरविणारें

त्याचें मन ( ' मोहन ' ), बाभुळवाडीच्या स्टेशनाबाहेर ' हनुवटीवर दिसूं लागलेले ते छोटे छोटे केस ' पाहत पधराव्या वर्षातून सोळाव्या वर्षाची आतुर अभिमानाने प्रतीक्षा करणारा वसत, आणि शेवटीं उषेला गवसलेला ( तद्वत् उषेला जिंकणारा ) वीस वर्षाचा ' छोटा ' वसत ( ' मीलन ' ), ह्या आणि अशाच इतर सुरुवात-शेवटाची रचना गाडगिळाच्या कौशल्याची साक्ष पटवतात त्याचें हें कौशल्य किती बहुविध नि मार्मिक आहे याची कल्पना यायला वाचकानी त्यांच्या बहुतेक सर्वच कथाची सुरुवात आणि त्याचे शेवट हीं नीट तपासून पाहावी विरोधी लयावर आधारलेली ही कलापूर्ण आविष्कार-पद्धति सुरुवातीला-शेवटीच नव्हे तर इतरत्रहि निरनिराळया सूक्ष्म पण मनोवेधक स्वरूपात योजिलेली वाचकाना आढळेल, आणि प्रतिभेच्या प्रकृतिधर्माने साधलेलें सहजसौंदर्य कृत्रिम तंत्रयोजनेच्या प्रसाधनापासून किती लाब असतें याचा त्याना प्रत्यय येईल

गाडगिळाच्या निवेदनशैलींत दुसरीहि एक खुबी वाचकाना आढळेल. ती म्हणजे व्यक्तींची आणि घटनाची उतरड. एकामागून एक अशी व्यक्तींची भराभर नोंद न करता अथवा वर्णनाचा सोस न बाळगता, घटनेमागून घटनेचें अगदी अत्यवश्यक तेवढें चित्रण करीत, मोजक्या शब्दात आणि अनलंकृत धाटणीने गाडगीळ ही उतरंड इतक्या सफाईपणाने रचून जातात की तिच्या परिणामकारकतेव्यतिरिक्त निराळी अशी तिची जाणीवहि वाचकाला होऊं नये. ह्यापैकीं पहिली म्हणजे व्यक्तींची उतरंड, प्रामुख्याने अफाट मानवी जीवनाची बहुरंगी विविधता, जगाच्या गजबजलेल्या रंगभूमीवर अखंड वावरणारी अनोळखी, विचित्र, दाटीवाटीची विलक्षण गर्दी सूचित करण्याकरिता योजलेली असते नटव्या मालतीबाई आणि त्याचा बावळट नवरा, खिकाळणारे घारुअण्णा नि तिरवे बंडोपंत, जुन्या छत्रीशीं ठाकठोक करणारे शामराव आणि किरट्या आवाजाचे काटकुळे ऐनापुरे, शेंबडें मूल दिसलें की ' ईऽ' म्हणणारी नाजुक लीला आणि गॅलरींत गोलंदाजीचा आविर्भाव करणारा मनोहर, चड्डी वर ओढीत बाहीला नाक पुसणारा दामू, भाडखोर बनी, बापडा दोन वर्षांचा शाम, नाजुक मनाचा मधू, नुसत्याच राधाबाई

नि नुसतेच माधवराव–ह्या सर्वांची नोंद होताच पेरूवाडींतील खुटमुट्याची चाळ जिवंतपणे उभी राहते तिच्याभोंवती रस्त्यातला लठ्ठ दादा, चपळ पीळदार शरीराचा एक पोर, तारावलेल्या डोळ्याचा राकट साथीदार, हातात शेणाचा गोळा असलेला रामा गडी, धंदा विसरलेला वेर्णावाला, घाबरून पळता-पळता मागे वळून बघणारी मुलें, एक छानछोक तरुण, बेफिकीर भय्या, दामटी वळल्याने किंचाळणारी म्हातारी, दाडगा मवाली, पोलीस, दोन-चार बायका नि बरीचशीं मुलें घेऊन जाणारा कारकून–ही दुसरी उतरंड बांधली म्हणजे जगाच्या रंगभूमीवरचा आपला बजबजपुरी देखावा सज्ज होतो (“ किडलेलीं माणसें ”). अशीच उतरंड गाडगीळ जेव्हा घटनाची लावतात तेव्हा हेंच वैचित्र्य, हीच विविधता, हीच विपुलता, ते व्यक्तिसंज्ञेच्या पातळीवर नेतात, आणि त्या पातळीवरील गुतागुंतीची, मानसिक व्यापाराच्या कोलाहलाची मनोरम प्रचीति आणून देतात मग व्यक्तिसंज्ञेची ही पातळी नीमाची असो (“ बाई शाळा सोडून जातात ”), वसंताची असो (“ मीलन ”), सुशीलेची असो (“ कडु आणि गोड ”), गणूची असो (“ गणूचें लग्न ”), अन्नपूर्णाबाईंची असो (“ थकवा ”), वा नानाची असो (“ उतूं गेलेलें दूध ”). घटनाच्या असल्या उतरंडीने व्यक्तिसंज्ञेच्या पृष्ठभागाच्या विस्ताराबाबत गाडगीळ जो परिणाम साधतात, तोच ते तिच्या खोलीबाबत, तळाबाबत संवेदना-कल्पनाच्या उतरंडीने साधतात (“ सलामी ”, “ गिचमिड ”)

गाडगिळाच्या कथापद्धतींत आणखीहि पुष्कळ हृद्य मर्मे आहेत. लिहिता-लिहिता मधेच ते एखादा बारीकसा तपशील सहज सांगून जातात आणि त्या इवल्याशा गोष्टीने अनंत अर्थवलयें वाचकाच्या मनात उठवून कथेच्या आशयाच्या मर्यादा आश्चर्यकारक रीतीने विस्तृत करतात. नातवाने दिलेलें सरबत ‘ आपल्या दंतहीन तोंडानें ’ ‘ मचामचा पिऊन ’ टाकल्यावर केशवच्या पाऊणशें वर्षांच्या म्हाताऱ्या आधळ्या आजीच्या हनुवटीवर एक थेंब थरथरत थाबला; आणि मग “–हें सारें बोलताना तिच्या हनुवटीवरचा थेंब सारखा थरथरत होता.” (“ गिचमिड ”.) त्या थरथरत्या पण न पडणाऱ्या, न

पुसल्या गेलेल्या एका थेंबात सबंध मानवी जीवनातील विकल गोष्टी नि अथाग पण क्षुद्र ओलावा, त्यातली महान् असहायता नि अस्थिर पण हास्यास्पद आर्तता व धडपड गाडगिळानी ओतली आहे सरबताच्या त्या एका थेंबापुढे अनंत अश्रूंची ओली किमयाहि फिकी, कस्पटासमान भासली असती इतकी विशाल हृदयद्रावकता त्यात आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं "आणि एक लूत लागलेलें कुत्रें शेपटी घालून बाजूला झालें" ("ते डोळे") असा एक पूर्णपणें अप्रस्तुत वाटणारा तपशील गाडगीळ जणु गाफिलपणाने देऊन जातात पण नंतर, देशाकरिता फासावर गेलेल्या बापाची पोरकी नि भिकारडी पण जळत्या वातीसारखी पोर जेव्हा एका मिलिटरी लॉरीखाली सापडून मरते, तेव्हा स्वार्थाची, मुर्दाड अहंकाराची, बेशरम सहानुभुतिशून्यतेची लूत लागलेल्या सर्व मानवी प्राण्याना आपल्या संकुचित मनाची शेपटी घालून बाजूला होण्याखेरीज गत्यंतर उरत नाही, आणि एका बारीकशा तपशिलातून एक भव्य, किळसवाणें प्रतीक उभें राहतें. तपशिलाची ही युक्ति गाडगीळ विनोदी संदर्भांतहि तितक्याच शिताफीने वापरतात. सुशीला कागदावर **कावळा** काढते ("कडू आणि गोड") आणि नीमा पाढऱ्या कागदाचें **बदक** कापते ("बाई शाळा सोडून जातात") साधा तपशील आणि यःकश्चित् पक्ष्याचा प्रश्न पण त्याची अदलाबदल झाली तर त्याच्या उल्लेखाचें सारें स्वारस्य नष्ट होईल.

जी गोष्ट ह्या बारीक तपशिलाची तीच गाडगिळाच्या उपमा-उत्प्रेक्षांची. भाषेला, कथनशैलीला केवळ नटवेपणा आणण्याकरिता गाडगीळ त्याचा उपयोग सहसा करीत नाहीत. त्यातील विचित्रपणा, धक्का देणारें मनोहर नावीन्य ह्याची सार्थकता नुसत्या 'काहीतरी निराळें'पणात बहुधा नसते. कथेच्या आशयाशीं ह्या उपमा-उत्प्रेक्षा इतक्या अविच्छिन्नपणें समरस झालेल्या असतात की त्याचा उद्रेक गवतावर बहरणाऱ्या फुलांइतका नैसर्गिक वाटतो. ह्या दृष्टीने—'एका आठवणीनें टुणदिशीं डोक्यात उडी मारली' ("मोहन"); 'पण शेटजींनी एकादें कोळिष्टक झाडून टाकावें तसें त्याचें बोलणें झाडून टाकलें' ("गणूचें लग्न"); 'इतक्यात एका उंच ठिकाणीं बसलेल्या वृक्ष

चेहेऱ्याच्या घड्याळाने ठणठणाट केला. जणूं रागीट आजोबा खाकरले' ("नवें जग"), 'त्याचें मन चिंच लावून घासलेल्या भाड्यासारखें अधिकच निर्मळ झालें होतें' ("थकवा"), 'तिला पहाताच त्या साऱ्या विचारांनीं त्याच्या मनात गर्दी केली सरबत शिंपडलेले बर्फाचे गोळे विकणाऱ्याची गाडी पाहिली म्हणजे छोटीं मुलें भोंवती गर्दी करतात ना, तशी.' ("क्षुल्लक गोष्ट"), अशा कितीतरी उदाहरणातील उपमान-उपमेयाची छाननी मनोरंजक होईल पण त्याचा फक्त निर्देशच करून समाधान मानलें पाहिजे. कारण, गाडगिळाच्या निवेदनशैलीच्या ह्या आणि दुसऱ्याहि अनेक हृद्य मर्माची यथार्थ चर्चा करायची म्हणजे प्रत्येक कथेगणीक एकेक लेख लिहावा लागेल. तेव्हा सामान्यपणें एवढें म्हटलें म्हणजे पुरें की, त्याची ही शैली नि तिचा घाट त्याच्या कथावस्तूला अशीं समर्पक, घट्ट आणि सहजसुंदरतेने बसतात की जणू ओळखीच्या चाभाराकडून मुद्दाम बांधवून घेतलेला बूट पायाला न चावता, न करकरता, सुखाने बसावा ! म्हणूनच गाडगिळांच्या कलेचें ही शैली म्हणजे नुसतें एक विलोभनीय आकर्षणच नव्हे, तर परमार्थत: अविभाज्य असें विशेषण आहे तिचे वर उल्लेखलेले अलंकार हे अलंकार नसून अवयव आहेत. प्रथितयशाचे कित्ते गिरवून किंवा तंत्राचे ठोकळे जमवून तिची गुरुकिल्ली लाभत नाही खुद्द गाडगिळानाहि अशा कृत्रिम पद्धतीने तिच्या सौंदर्याची सिद्धि करता येणार नाही. मागावर ताणलेल्या सुताशीं जोपर्यंत ते इमान राखतील तोपर्यंतच त्याचीं बोटें प्रतिभेची ही सुंदर कलापूर्ण, आशयानुसारी वीण ढळूं देणार नाहीत. तिच्यात जरा रंग फेकायचा प्रयत्न केला की बेरंग होईल.

वर उल्लेखिलेली आविष्कारशैली ज्या अनुभवाच्या, आशयाच्या प्रकटनासाठीं गाडगीळ वापरतात, त्या अनुभवाचा, आशयाचा पहिला पीळ काव्याचा आहे. तो भरताना विशिष्ट वयोमानानुसार काही ठिकाणीं हात ढिला पडल्याने सूत विशविशीत निघालें, काव्यात्मकतेने स्वप्नरंजनाची कळी खुलविली, तरी स्मृतीच्या वाळत जाणाऱ्या देठातून सकस भावनेचा रस पुरविला जाणे क्वचित्‌च सभवनीय असते. पण काव्यात्मकतेच्या ह्या स्वरूपाबद्दल

फारसें लिहिण्याची येथें जरुरी नाही. कारण, स्वप्नरंजनाला बिलगून वाढणाऱ्या किंवा त्याच्या आडोशातच तग धरणाऱ्या भावनाचा लवकरच पाचोळा होतो, आणि गाडगिळानाहि त्याची जाणीव यापूर्वीच झाली आहे हें एक, आणि दुसरें म्हणजे गाडगिळाच्या लिखाणातील हा लुसलुशीत नीलसर-गुलाबी भाग बोट ठेवून कुणाला दाखविला पाहिजे असें नाही तो सर्वांना आपोआप प्रतीत होण्यासारखा आहे. पण गाडगिळाची काव्यात्मकता जेव्हा खरा पीळ भरते तेव्हा त्याचें स्वरूप मात्र नि सशय डौलदार बनते. त्याच्या भावनेत ताजेपणा आहे, रसाळता आहे. ती उद्रेकली तरी समंजसपणा सोडीत नाही, पिळवटली तरी पीळ जाऊ देत नाही धरलेल्या मर्यादेंत ती हृदयंगमते-बरोबर सामर्थ्याची आणि ललित्याबरोबर सौभाग्याची जोडेकरीण असते. ‘ एका कोपऱ्यात एक रकटे टाकून ’ ‘ अगाची अगदीं जुडी करून ’ झोपलेल्या जानकीच्या ‘ दबलेल्या हुदक्या ’ने ती जागी होते ( “ गणूचें लग्न ” ); थंडीत कुडकुडणाऱ्या बारा-तेरा वर्षाच्या एका भिकारड्या पोरीच्या बरगड्या पाहताच ती डोळस बनते, नि पोलिसखात्यात निर्ढावलेल्या नं ३२२ च्या कोटालाहि उबेची वाचा फोडते ( “ ते डोळे ” ), बाईंच्या शाळा सोडायच्या दिवशीं छोट्या निमाच्या आयुष्यात घडणाऱ्या एकामागून एका प्रसंगातून भावनेची मनोज्ञ वलये निर्माण करीत एक सबंध गोष्ट झुळझुळणाऱ्या माधुर्यात न्हाऊन निघते ( “ बाई शाळा सोडून जातात ” ); देशसेवेचें ‘ साहसयुक्त रोमाचकारी ’ वर्णन करून, स्वप्नसृष्टींत गुरफटलेल्या ‘ कुसमी ’च्या पाठीत जेव्हा खादीचे कपडे घालून खेड्यात हिंडणारे ‘ डाक्तरकाका ’ जोराने थाप मारतात तेव्हा त्याच्या हस्तस्पर्शाने ही काव्यात्मकता थरारून जाते नि आपल्या आशयाला एक वेगळाच पीळ घालते ( “ नवे जग ” ), ‘ चाललें होतें ! रडत-रखडत–कोठेंतरी ! ’ अशा अनंताच्या आयुष्यात हीच भावना-शीलता, क्षणभर का होईना, पण ‘ कॅफे आय् डिअल ’चें ‘ कॅफे आय्डल् ’ बनविते, मोटारीच्या तावड्या शेपूट-दिव्यातून ‘ अबाड्यात खोवलेलें ऐटबाज गुलाबाचें फूल ’ बहरविते, नि मग मृगजळातूनहि एक बारीक धार पाझरते ( “ क्षुल्लक गोष्ट ” ).

काव्याचा असा पीळ भरत असतानाच गाडगीळ त्यात विनोदाचा एक धागा इतक्या बेमालूमपणें मिसळून देतात की त्याच्या लिखाणांत काव्य कुठे सपतें नि विनोद कुठे सुरू होतो ह्याचा सभ्रम पडावा स्वयंकेंद्रित काव्यात्मकतेचें जरा विकृत नि ढोबळ परावर्तन त्यांच्या 'शंभरटक्के विनोदी' लिखाणात झाल्यानतर आता तिचा गुरुत्वाकर्षणबिंदु बदलला आहे जीवनाच्या आसावर जराशा आत्मविश्वासाने तोल साभाळणारी त्याची भावना आता कथानकाचा फेर धरता-धरता विनोदाच्या तालात लीलया हसून जाते. जणू एका तालाचींच तीं दोन निरनिराळीं आदोलनें घेत आहे! त्यामुळे उपहासाचा अवलंब त्याच्या विनोदाने क्वचित् ठिकाणीं केला तरी त्याचा स्थायीभाव गोड नि हसऱ्या सहानुभूतीचाच राहतो म्हणूनच ह्या विनोदाच्या रम्य विलासात ओतलेलीं त्याचीं मुलींमुलें, तरुण-तरुणी व वयस्क स्त्रीपुरुष हसत-हसत नि हसवीत-हसवीत वाचकाचीं हृदयें काबीज करतात हसता-हसता त्याचा विनोद हृदय खेचूं लागतो, आणि हृदय खेचता-खेचता त्याची भावना कोलमडून पडते खेळकर नि खोडकर मुलामुलींच्या लीलातून चमकणारा जरासा 'आडदाड' विनोद गाडगिळाच्या कुठल्याहि शिशु-कथेंत सापडेलच. पण त्याशिवाय इतरहि पैलू त्याच्या विनोदाला आहेत. बिस्किटें खात 'टुक-टुक माकड' करणाऱ्या मधूला नीमा चिमटा काढणार तोंच शाळेतल्या बाईंनी काय सागितलें ते तिला आठवलें आणि तिने नुसते त्याला वेडावलें-हो, 'वेडावायला काय हरकत आहे? वेडावलें तर चालते' ("बाई शाळा सोडून जातात") ह्यातलें निरागस समर्थन एकीकडे, तर 'फक्कड तेलाच्या बाटली'बद्दल 'सणसणीत तीन रुपये' दिल्यावर दुकानदारावर 'लुच्चा कुठचा. उगीच महाग वस्तू गळयात बाधतो' म्हणून रागावणाऱ्या नानाचें िततकेंच भोळें तर्कशास्त्र दुसरीकडे ("उतू गेलेलें दूध"), बायकोच्या 'शौर्याच्या स्तुतीने' घर दुमदुमत असताना 'दुहेरी वेदनानीं' पाठ सणकणाऱ्या विनायकाचें मूक चित्र एकीकडे ("प्रिया आणि माजर") तर 'कठड्याजवळ जाण्याकरिता' उघडउघड धक्काबुक्की' करीत 'शेवटीं शामरावाच्या बगलेतून' मान काढून 'किरट्या आवाजात'

किंचाळणारे ‘ काटकुळे, अजागळ ऐनापुरे ’ दुसरीकडे ( “ किडलेलीं माणसें ” ), सून आणि मुलगा याच्यात आपल्याबद्दल दुसऱ्या खोलींत चाललेलें भांडण ऐकून ‘ मी—मी… ’ म्हणत उगीचच आपल्या खोलींत जोराने फेरी मारणाऱ्या तात्याची ‘ मौज ’ एकीकडे ( “ रिकामी बस ” ), तर जवाहरलाल नेहरूंवर ‘ प्रेम जडवणाऱ्या ’ तेरा वर्षाच्या कुसुमची गोड प्रेमकथा दुसरीकडे ( “ नवें जग ” ), सर्व व्रात्य आणि खोडकर मुलाचा अनभिषिक्त बालसम्राट गोदू एकीकडे ( “ कशी झाली गंमत ” ), तर चलाख शालीनतेंतून विनोदबुद्धीची कमनीय झाक फेकणारी सुशीला दुसरीकडे ( “ कडू आणि गोड ” ) अशा एक-ना-दोन अनेक प्रसंगात नि व्यक्तींवर काव्याची झिमूझिम् पडते न पडते तो त्यातून गाडगिळांच्या विनोदाच्या विविध परिमललहरी प्रसन्नतेने नि मृत्तिकागंधाच्या नाजुक छटाछटानी दरवळतात.

काव्यात्म, भावनाशील जीव सभोवतालीं पसरलेल्या जीवनाच्या दाबाने अपरिहार्यतया अंतर्मुख बनतो, आणि मग मानवी मनाच्या गूढ गुंतागुंतीकडे तो प्रथमच जरा बिचकून, भिऊन पाहूं लागतो वरून साळसूद दिसणाऱ्या संज्ञाप्रवाहाचा जबडा अशा रीतीने उघडा झाला की त्यात ब्रह्माडाचें प्रतिबिंब पडतें. आकाशातल्या मरून गेल्यानंतरहि चमकणाऱ्या ताऱ्याच्या चेहेरेपट्टींत गवती फुलाचे झुपके लागलेले दिसतात, पहाडांच्या पाषाणी वक्ष:स्थलावर सूर्यकिरणाचीं डोकीं हापटून फुटलेलीं आढळतात; पीठ झालेल्या मनाच्या ढिगाऱ्यात जन्ममृत्यूच्या घुशी आपलीं नाकें पेरतात; वाऱ्यावर फडफडणाऱ्या पानातून कातरलेल्या आयुष्याचे विदूषकी डोळे गदगदपणें हसू लागतात. या अफाट, विस्कळित साम्राज्यात अक्षांश-रेखांशाचा कंपास निरनिराळ्या ठिकाणीं आपला उजवा पाय रोवून फिरूं लागतो तो भोवळ येईपर्यंत ! असें झालें म्हणजे मग हिंमत असेल तर भरताने सिंहाच्या छाव्याचा जबडा उघडा धरून आपल्या आईला त्याचे दात मोजून दाखविले त्याप्रमाणे संज्ञाप्रवाहाच्या त्या जबड्यात डावा हात घालून तो जबडा उघडा धरायचा नि त्यात पडलेल्या प्रतिबिंबावरची दृष्टि अचल राखीत उजव्या हाताने पापपुण्यापलीकडे असलेल्या परमेश्वरासमक्ष

ब्रह्मांडाचें रूप आकारायचें ! साऱ्याच वाङ्मयीन कलावंताच्या प्रवासाचा हा आराखडा आहे. फरक फक्त हिंमतीचा !

ह्याच प्रवासावर गाडगिळानाहि आपलें पाऊल टाकावें लागलें आहे. त्याचें पहिलें चिह्न म्हणजे मानवी मनोव्यापाराबद्दल त्याना वाटणारें कुतूहल, त्याच्या गुंतागुतीचें परीक्षण नि चित्रण करण्याबद्दलचा त्याना असणारा वेध. वर एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणे त्याच्या कथात प्रसगापेक्षा प्रवृत्तीची, कृतीपेक्षा आणिवेची, आशेपेक्षा इच्छेची आणि जगण्यापेक्षा जिवतपणाची महती अधिक आहे. स्त्रीपुरुषाचीं, लहानमोठ्याचीं त्यानी रंगवलेलीं सगळींच 'मानसचित्रें' ह्याची साक्ष कमीअधिक प्रमाणात पटवतात. त्याच्या कथातील प्रसंगांचा मालमसाला अगदी साधा आहे : अवखळ मुलामुलीच्या खोड्या किंवा हट्ट, संसारांत नित्यशः दिसणारीं घरगुती भाडणें, आगगाडीचा प्रवास किंवा सिनेमाला जाणें, बॅंकेच्या मॅनेजरची गाठ किंवा मोटारीच्या उतारूशीं पेरूचा सौदा, ह्या आणि इतपतच रहस्य(?)मय अशा घटनापलीकडे गाडगीळ क्वचित् जातात. पण जीवनाच्या या अगदी सामान्य पातळीवरच शेकडा नव्याण्णव जीवाचें आयुष्य पागलेलें असतें त्यातून गाडगीळ मानवी मनोव्यापाराच्या आकृती विणतात–उकलतात, ह्यातच त्यांच्या कलेचें चातुर्य नि सौंदर्य सामावलेलें आहे ह्या चातुर्याचें खरें निदान गाडगिळांच्या 'मानसचित्रा'ना उनाड मुलगा, भोळा म्हातारा, सुशील आणि शालीन पत्नी, हुरहुरणारी युवती किवा भाबावलेला तरुण, सयमशील पोलिस किंवा प्रेमळ छोकरी, स्वाभिमानी पोर किंवा छद्मी मनुष्य, कजाग सासू किंवा मनांत काहीतरी खुपत असलेला तरुण अशा तऱ्हेचीं 'लेबलें' चिकटवून करतां येणार नाही. त्याचप्रमाणे उनाड मुलाचे, थकलेल्या म्हाताऱ्याचे अथवा प्रेमलोलुप तरुणाचे किती प्रकार गाडगिळानी हाताळले आहेत त्यांची वर्गवारी करून गाडगिळाच्या कलेतील भावनाबंधाच्या सौंदर्याची यथार्थ कल्पनाहि देतां येणार नाही. गाडगिळाच्या 'मानसचित्रा'तील आकृती यापेक्षा अधिक लवचिक आहेत; त्यांतील रंग अनपेक्षित रीतीने मिसळलेले आहेत; आणि त्यांतील छायाप्रकाशाची पखरण अधिक तरल आहे. त्यांत रेषा आहेत,

पण जाळें नाही, विशिष्ट लकब आहे, पण ओढाताण नाही त्यांत ढोबळपणा क्वचित् आढळला तरी भडकता सहसा दिसणार नाही मानसिक प्रक्रियाची स्वरूपें, मनोव्यापाराचीं वळणे सनातनच राहणार, आणि इतर लेखकानी त्यांचें चित्रण केलें आहे नि अजूनहि ते करीत आहे पण गाडगिळाचा रंगफलकच निराळा आणि त्याचे कुंचलेहि निराळेच त्याना पूर्वीच्या लेखकात तोड सापडणार नाही नुसत्या हलुवार हाताचाच हा प्रश्न असता तर कादंबरीक्षेत्रात हरिभाऊ आपट्याच्याकडे आणि लघुकथेच्या क्षेत्रात य गो. जोशी याच्याकडे बोट दाखविता आलें असतें पण प्रश्न हाताच्या हलुवारपणाचा नसून दृष्टीच्या एका वेगळया डायमेन्शनचा आहे, वाङ्मयीन धनुष्याच्या चौथ्या प्रत्यंचेचा आहे. कारण, जागृत सुसज्ञ मनाचें दर्शनी विणकाम उलगडणें निराळें, आणि या दर्शनी विणकामातून भरलेल्या आकृतींची आतल्या अगाच्या, पाठीमागच्या भागाच्या सलग वा तुटलेल्या पदरांशीं सागड घालणें हें निराळें.

अशी सागड घालण्याचा प्रयत्न गाडगीळ करतात व्यक्तिव्यक्तीच्या परस्परसंघर्षातून उठणारे मानसिक तरग तद्वत् सवेदना-विचाराच्या अनुरोधाने व्यक्तिमनात उसळणाऱ्या पक्व-अपरिपक्व भावना आपल्या धनुष्याची ही चौथी प्रत्यंचा ओढून गाडगीळ शब्दस्वरूपात रोखतात, लहान वा मोठ्या व्यक्तिमनाच्या अगदी पातळ आणि नक्षीदार अशा झिलप्पा ते काढतात स्वेच्छेने दाबून ठेवलेल्या प्रवृत्ता वा परिस्थितीने दाबाव्या लागलेल्या, दाबून गेलेल्या प्रवृत्ती मेलेल्या मनातून ओकेपणाची, अस्वस्थते-ची आग लावीत सूड उगवताना ह्या झिलप्यात आपणास दिसतील, त्याचप्रमाणे स्वयंकेंद्रित मनोव्यापारानी मनाच्या साऱ्या नैसर्गिक उत्साहाची दैना केलेलीहि आपणास आढळेल (" प्रक्षोभ ") कोवळ्या वयात बसलेल्या ' बेदम मारा 'च्या धास्तीने लुळें झालेलें मन शेवटी स्वत.लाच कसें भेडसावूं लागतें नि अस्वस्थ चित्ताने कुठल्यातरी आधाराला बिलगण्याकरिता, त्या आधारालाच लटकेपणें दूर ढकलीत, कसें वेडावतें (" रिकामी बस "); गळ्याच्या जीवनात चेंगरून गेलेला अहंभाव आणि सभोवतीच्या दृश्यांनी

उत्तेजित केलेला लिंगगंड या दोहोंच्या विलक्षण संघर्षाचा परिपाक गरीब पत्नीला दाखविलेल्या क्रूरतेंत नि संभोगसौख्यात कसा होतो ("गणूचें लग्न"), आईबापाच्या प्रेमाच्या मखमाली कोषातून बाहेर पडल्यावर वात्सल्याची ऊब गेल्याने गारठणारा अहंभाव नि लैंगिक ग्रंथींच्या नैसर्गिक क्रियाचा परिणाम ह्यातून स्वत भोवती स्वप्रसृष्टि निर्माण करणाऱ्या मुलीची मूर्तिपूजक प्रवृत्तीच तिला कशी तारते ( " नवे जग " ), जागेपणीं आलेल्या अनुभवाना स्वप्नसृष्टीची किमया विचित्र स्वरूपात का आणि कशी नटवते ( " मोहन ", " बाई शाळा सोडून जातात " ), आणि जागेपणीच्या उद्वेग-समस्याना स्वप्रसृष्टि कशा रीतीने वाट फोडते ( " चुबन " ), शिणलेलें मन सत्यसृष्टींत न गवसणाऱ्या श्रेयाची, सुखाची भरपाई दिवसा स्वप्नें पाहून कशी करून घेतें ( " क्षुल्लक गोष्ट ", " स्वप्नरंजन " ), किडलेल्या मनातून कोणत्या अत:प्रवृत्ती आपला दावा साधतात ( " किडलेलीं माणसें " ); खऱ्या जगाच्या पहिल्या सलामीने मनोवृत्ती कशा करपायला लागतात ( " सलामी " ), आणि खोट्या जगाच्या गिचमिडीने सुजाण मनहि कसें भाबावून जातें ( " गिचमीड " )–सथ तद्वत् बिथरलेल्या सज्ञाप्रवाहाच्या अशा बारीकमोठ्या स्पंदनातून, सह-स्पंदनातून आणि प्रति-स्पंदनातून गाडगीळ मानसिक प्रक्रियाचें रमणीय सगीत निर्माण करतात सत्यसृष्टि आणि स्वप्रसृष्टि याचे संबंध, अहंगंड, न्यूनगंड वा हीनगंड, लिंगगंड याचे विविध आविष्कार, मानासिक अवरोध ( repression ), प्रतिपूरण ( compensation ) ह्याचीं जिवंत प्रत्यंतरें, अशा निरनिराळ्या तालात ह्या संगीताच्या रागदारीची सजावट होते. आणि ह्या संगीताला भरीवपणा आणण्याकरिता आपल्या कथांत गाडगीळ दुय्यम पात्राच्या रूपाने निरनिराळ्या पट्टींतल्या वाद्याची साथ उभी करतात.

मनोव्यापाराच्या ह्या संगीताला जिव्हाळ्याची झार यावी म्हणून गाडगीळ नेहमी झटतात. त्याच्या बालमुकुंदी जगात भावनांचे आकार शारीरिक नि इंद्रियसंवेदनाशीं शक्य तितक्या निकटतेने निगडित आणि प्रदर्शनप्रिय असे राहतात. ' काकांच्या टेबलावरच्या हिरव्या मऊ आवरणाने '

' हाताला विलक्षण गोड गुदगुल्या ' केल्यामुळे " किती मजा वाटते ग ह्या कापडावरून हात फिरवला म्हणजे ! " असें म्हणणारा कुसुम (" नवे जग "); बाईचें गाणें " किती गोड होतें म्हणून सांगूं ? अगदीं कलिंगडाच्या मधल्या गरासारखें " असें म्हणणारी नीमा आणि बाई डोक्यात फुलें घालू लागल्या म्हणजे ' त्याच्याकडे वेड्यासारखा ' पाहत राहणारा विनू (" बाई शाळा सोडून जातात "), आईला चापटी जोराने मारताच येत नाही आणि ' बाबा फार जोरानें मारतात ' असे शेरे देणारा गोंदू (" कशी झाली गंमत "), जीवित ' भाकरीच्या तुकड्यासारखें ', ' मिठाच्या दाण्यासारखें ', ' चिंचेच्या गुळमट बोटकासारखें ' चवदार वाटणारा भिकू (" सलामी "), बरगड्याची छाव गेली, पोटात आग उठली तरी एका ' आधळ्या मामा 'ने " मला आडोशाला बोलावून..." इतकेंच म्हणून स्तब्ध होणारी व हातांतली गवताची काडी दूर फेकणारी पोर (" ते डोळे ")—या सर्व चित्रात शिशु-भावना संवेदनाशीं किती एकजीव असतात हें आपणांस पाहावयास मिळेल. ह्याच शिशुभावनांच्या प्रदर्शनप्रियतेचे दाखले गाडगिळांच्या कथांतून काय निवडायला हवेत ? तथापि, एका टोकाला अगतिक रागात जानवें काच लागेपर्यंत ओढणारा गोंदू, आणि दुसऱ्या टोकाला झिपऱ्या कमळीपुढे " आमचे पुणें " " रामाच्या शेंडीइतकें लाब आहे " अशी फुशारकी मारणारा मोहन याचा उल्लेख करून ठेवतो. भावनाच्या ह्या दुहेरी शिशुसृष्टी-च्या आनंदाची परिसीमा आईच्या कुशींत होते, शाळेतल्याबाईचा मुका किंवा दुधावरची साय येथपर्यंत तिच्या गुपिताची मजल जाते, मोठ्या घड्याळाला किल्ली देणें हा तिच्या महत्त्वाकाक्षेचा एक मोठा पल्ला ठरतो, आणि टपली कशी, कुणाला व केव्हा मारायची अथवा धाकट्या बहिणीने घेतलेल्या विटीचा कबजा परत कसा मिळवायचा एवढे बिकट पेचप्रसंग तिच्यापुढे नेहमी उभे असतात. तिची व्रात्य मुलुखगिरी ' मोठ्या 'नी उगाचच्या उगीच घातलेल्या पायबंदानी कडवट होत नाही, तर उलट दुप्पट उत्साहाने नवीन-नवीन प्रांताकडे वळते. मारणें आणि मार खाणें हें या सृष्टीचें नैसर्गिक जीवन आणि ढोंगी रुदन हें तिचें प्रभावी शस्त्र ! पण इतकें असूनहि तिच्यांत

राठ कोडगेपणाचा वास नाही उलट, भावनाक्षमतेचे तारक लाघव तिच्यांत निर्मळतेने टिकलें आहे ज्या क्षणाला ह्या सृष्टीच्या अनभिषिक्त सम्राटाची चीड किंवा राग यावा त्याच क्षणाला त्याच्या ' पोटातलें रडणें ' वर येताना पाहून वाचकाचा दूषित ग्रह धुऊन निघतो आणि आपल्या हृदयाच्या आवळीच्या सिंहासनावर तो त्या सम्राटाची पुनश्च स्थापना करतो ( " कशी झाली गंमत " ). वाढत्या वयाबरोबर शरीरात होणारे रासायनिक बदल आणि जगाचे अनुभव ह्याच्या दुहेरी कैचींत भावनांचे हे आकार बदलतात, संवेदनापासून ते तुटतात किंवा दूरावतात आणि कल्पनाविचारांच्या पोटीं लपतात. संज्ञाप्रवाहातून सहजस्फूर्तीने उचंबळून येण्याऐवजीं मान मुरडून भावना आत पाय घेते. मनाच्या अंतःप्रवृत्ती स्वतःभोवती सुजाणपणाच्या विविधाकृती शिंपल्याचीं घरे बाधतात किंवा आडवळणी विकृति-विकारात वा बाष्कळ बहिर्मुखतेंत परावर्तित होतात. भावनेच्या कासवालाहि पाठ असते, पण ती दगडाची. शेवटीं, तारुण्याचा मध्यबिंदु गेल्यावर, अंतःस्थ प्रवृत्तींनी आकारलेल्या भावना वयस्कतेच्या क्षितिजशून्य पठारावर संथावतात नि ओकेपणा, अस्वस्थता, अनाकलनीय भीति, अजाण आर्तता याच्या दऱ्याखोऱ्यातून अगतिकतेने मार्ग धुडाळूं लागतात[1]. तुटलेल्या घळीच्या आश्रयाने, सुटलेल्या खडकाच्या तळ्यातून, साधलेल्या पुलाखालून त्या हळू-हळू झिरपतात, किवा, झाकल्या डोळयानी, डबकीं बनतात[2].

मानससरोवरांतली ही गंगा अशा रीतीने काशींत गुप्त होऊन रामेश्वरांत प्रगटते, नाहीतर, आटणाऱ्या वा आटलेल्या पात्रात ठिकठिकाणीं तुंबून कृमिकीटकाची धनीण होते. म्हणून गाडगिळाच्या ' मानसचित्रां 'ची रागदारी सुचविते की, काशीपर्यंत ह्या गंगेकडे मोकळेपणाने पाहा, काशींत आणि काशीनंतर तिला आटूं देऊं नका; रामेश्वरात ती दिसली तर हसावेंसें वाटेल त्याने जरासें रडावें आणि रडावेंसें वाटेल त्याने जरा हंसावें !

---

१. " रिकामी बस ", " उतूं गेलेलें दूध ", " थकवा ", " गिचमिड ", वगैरे, २, " किडलेलीं माणसें, "

साहित्यांतल्या कलावंताच्या नशिबीं लिहिलेल्या अविरत नि अवघड प्रवासाची थोडी वाट गाडगिळानी येथवर कापली आहे. तिचा मागोवा घेतला, तो घेण्यात मन रमलें पण वाटेत चुकलेल्या पावलाची जाणीव त्याने बुजलेली नाही लघुकथेला गाडगिळानी ऊब दिली तिचा भागीदार झालों; म्हणून ठिकठिकाणीं तुटलेलें सूत नि काही ठिकाणीं ढिली पडलेली वीण डोळ्याआड करण्याची जरुरी नाही. पचवीसएक कथाच्या पसाऱ्यातच आवर्तपणा येणें धोक्याचे आहे. शब्दाची ' मौज ' झाली, वाक्यें 'गंमतीदार' पडलीं, म्हणजे अर्थ जाऊन अक्षरें उरतात हें ओळखायला हवें निरीक्षणाशीं समरस होण्याची हातोटी चुकली वा मानसिक प्रक्रियाच्या 'युक्त्या' जमूं लागल्या म्हणजे आशयाची साचेबंदी होते हा इषारा विसरता येत नाही. परिणामकारकतेचें मृगजल जिवत प्रतिमेला श्वास लावते आणि वैचित्र्याच्या कलाबतूंत खोट्या कसबाचे नख लपलेलें असतें ही जाणीव सतत ठेवायला हवी कलावंताची कष्टाची वाट लिखाणाच्या दगडानी मोजली जात नसून भावनाकृतींच्या प्रसरणशील कमानींनी तोडली जात असते ह्या आणि ह्यासारख्या तावड्या कंदिलाची जरुरी मराठी साहित्याच्या सिंहासनावर विराजणाऱ्यानाहि आहे. मग ती गाडगिळासारख्या नव्या मानकऱ्याला असल्यास नवल काय ? पण, ऐटीने हे कंदील फिरवून गाडगिळाच्या ' चष्मेवाल्या साहित्यिका 'चें सोंग वठविण्याच्या प्रयत्नाला बिचकूनच राहिलेलें बरें. फक्त, अर्धें पाऊल आगेमागे असलेल्या एका सह-वाटसराच्या काहीशा भाबड्या पण आशाळभूत स्नेहाने एकच गोष्ट शेवटी गाडगिळाना सागायची ती ही की, त्यानी शंभर-दीडशें कथा भराभर लिहून काढाव्या त्या संपल्यावर आपोआपच उपऱ्या कल्पना नि अचपल भावना काळ्याठिक्कर पडतील; शब्दाची करवत बोथटेल, मनोव्यापाराचे घडवलेले साचे जुने होऊन मोडतील, जमविलेल्या आशयाचा भुसा होऊन जाईल आणि अन्वयार्थी पलीकडचें हें असें वाङ्मयातलें वैभवशाली दैन्य एकदा आल्यावर मग—

पण कलावंताच्या हिंमतीची कुंडली कुणीं माडावी ?